# उषा.

उघडिं नयन, रम्य उषा हंसत हंसत आली

रेंदाळकर.

## ईश्वराचा खरा भक्त.

[ चाल—नशिव फिरलें, जसा अवघड सुंदर बाळा. ]

मजसि रुचतो, तो मात्र भक्त कौंतेया ॥ध्रु.॥

ज्ञानोज्ज्वल अंतर झालें
सत्तत्त्वहि चित्तीं उदेलें
प्रिय मला सखया, तो मात्र भक्त कौंतेया ॥
सकल दिसत ज्याला विश्व आत्मीय भावें
हृदयिं न धरि जो ' हें आपुलें, हें परावें '
" जरि दृढतम विश्वप्रेम चित्तीं धरावें
तरि मजविषयींची सार्थता भक्ति पावे "
हें ज्याच्या अंतरिं ठसलें
त्यानें वश मजला केलें
प्रिय मला सखया, तो मात्र भक्त कौंतेया ॥१॥

मजसि रुचतो०

# आनंदानें मार्गक्रमण.

[ कवि-**वसंतविहार** ]

चाल-पांडुनृपति जनक०

माझें हें विश्व ह्मणुनि ।। विश्वाचा मीहि गणुनि
भेदाभेदासि गिळुनि ।। क्रमित पथ मुदें ।। १ ।।
निर्वैरत्वासि वरुनि ।। प्रेमातें जवळि करुनि ।।
विनयशस्त्र हस्तिं धरुनि ।। क्रमित पथ मुदें ।। २ ।।
सुज्ञातें अनुसरोनि ।। तत्त्वांतें न विसरोनि ।।
निंदास्तुति यां त्यजोनि ।। क्रमित पथ मुदें ।। ३ ।।
धरणी शयनार्थ कधीं ।। गाद्या--गिरद्याही कधीं ।।
कधिं पादिं आरूढ कधीं ।। क्रमित पथ मुदें ।। ४ ।।
हो क्षुब्ध व्यसनार्णव ।। रक्षाया धैर्यप्लव ।।
नित्य करुनि ईशस्तव ।। क्रमित पथ मुदें ।। ५ ।।
सोडुनिया दुरभिमान ।। सत्पात्रीं देइ दान ।।
सद्विवेक सत्प्रधान ।। क्रमित पथ मुदें ।। ६ ।।
चंचल मन दृढ करोनि ।। भूतदया मनिं धरोनि ।।
सद्वचांसि संस्मरोनि ।। क्रमित पथ मुदें ।। ७ ।।



# हा येथें उभा कोण ?



आमचें घराणें शुद्ध कोंकणस्थ. आमचे वाडवडील परशुराम क्षेत्रांतील आंबे, नारळ व फणस सोडून देऊन सोलापूर जिल्ह्यांत रहावयास आल्यास दोनतीन शतकें तरी झालीं असतील. इतक्या अवकाशांत आमच्या गृहस्थितींत, राहणींत पेहेरावांत, बोलण्यांत, चालण्यांत पुष्कळ फरक पडला असला तर त्यांत कांहीं नवल नाहीं. आमचा व कोंकणाचा संबंध आतां कोंकणाच्या व कोंकणस्थपणाविषयींच्या आमच्या 'जाज्वल्य' अभिमानापुरताच राहिलेला होता. इतकें खरें कीं वर्षांतून एक दिवस कोंकणांतील सर्व देवतांस आह्मी सुग्रास पक्वान्नांचा नैवेद्य अर्पण करीत असूं, व माझी आई जरी पक्की देशस्थ दिसत असे, तरी बाबांच्या भाषणांत थोडीशी कोंकणस्थी 'नासिका-लकेर' आनुवंशिक क्रमानें राहिलीच होती. कोंकण आणि सोलापूर प्रांत ह्यांत वास्तविक पहातां जमीनअस्मानाचा फरक. कोंकण जितकें नापीक तितका इकडचा प्रांत सुपीक, कोंकण जितकें ताडी-माडीनें गजबजलेलें तितकाच इकडचा मुलूख माळ, कोंकणांत जितकीं सापाचीं वेटोळीं तितके इकडे हरिणांचे कळप, कोंकणांत जितकी सौम्य हवा तितकी इकडे रखरख, कोंकणांत जितकी पावसाची रिपरीप तितकी इकडे हवाशुद्ध बरसात,

कोंकणांत जितकें दारिद्र्य तितका इकडे सुखीपणा, कोंकणांत जितका कंजूषपणा तितकी इकडे उदारता व कोंकणांत जितकी टापटीप तितका इकडे धांमेपणा. अशा रीतीनें कोंकण व देश ह्यांच्यामध्यें ‘ मुलखाची तफावत’ असतांना आमच्या बाबांचा कोंकणीपणा थोडाबहुत त्यांना चिकटलाच होता. सृष्टिदेवी मनुष्यावरची आपली पकड इतक्या निकरानें दृढ ठेवते ह्याच्याबद्दल मानववंशशास्त्र तिला किती दुवा देत असेल बरें ?

परंतु बाबांच्यावर जरी कोंकणस्थी तिरीप थोडीबहुत कायम होती तरी आह्मी अगदीं हाडामासानें देशस्थच बनलों होतों ह्यांत शंका नाहीं. आह्मी कोंकणस्थ ह्मणून आमचा शरीरवर्ण जरासा उजळ असेल असें कोणास वाटेल, परंतु तसें मुळींच नाहीं. आह्मी अगदीं पक्के काळे बनलों होतों व लग्नसराईंत जेव्हां आमच्या प्रांतावर वरशोधकांच्या स्वाऱ्यावर स्वाऱ्या होत तेव्हां आमच्या जनूच्या बचावार्थ आह्मांस आमचा कोंकणस्थपणा कंठरवानें प्रसिद्ध करावा लागे. सोलापुरी कडक उन्हाळ्यांत हरिणांच्या पाठीसुद्धां जर काळ्या होतात, तर सूर्याचा आव बचावण्याकरितांच कां होईना, मनुष्यांनींही आपला थोडासा वर्णपालट करणें कांहीं वाईट नाहीं. मनुष्यानें आपलें तोंड काळें होऊं देणें हें अपमानाचें खरें, पण ज्या सूर्याचें सर्वत्र उज्ज्वलताच उत्पन्न करण्याचेंच काम त्यानें आपलें खरें कर्तव्य सोडून दिल्यावर मनुष्यांना खंत वाटून त्यांनीं आपला वर्ण काळा करावा हें साहजिकच आहे. आमच्या वर्णानें आम्हांस सोलापूर जिल्ह्याशीं इतकें मिसळून टाकल्यावर कोंकण आम्हांपासून दूर रहावें हें साहजिकच आहे. कांहीं कोंकणस्थ घराण्यांचा पुरातन इतिहास फार अभिमानाचा असतो. मुसलमानांना सत्तेस कंटाळून बाळाजी विश्वनाथ ह्या मुत्सद्दी कोंकणस्थानें जेव्हां आपल्या आवडत्या श्रीवर्धनास रामराम ठोकला तेव्हांपासून देशावर आलेल्या अनेक कोंकणस्थ कुलांनीं महाराष्ट्रीय साम्राज्यप्रसंगानें पराक्रमाचीं अद्भुत कृत्यें केलीं. परंतु पराक्रमामुळें प्रसिद्धीस आलेल्या कोंकणस्थांपैकीं आमचें कुल नव्हतें. आमचें कुल तरवारीनें कधींच प्रसिद्धीस आलें नाहीं. आमच्या कुलापैकीं कोणासही तरवारीचे वार लागलेले नव्हते व श्रीमंतांचा घोडा घाव लागून पडला असतां आपला घोडा त्यांस दिल्याबद्दल आमच्या कोणत्याही पूर्वजास इनाम मिळालेलें

नव्हतें. कोंकणांत जेव्हां उदरनिर्वाह करणें अशक्य झालें तेव्हां आमच्या आजो-बांचे आजोबा खांद्यावर पडशी टाकून व देव संवळींत घालून कोंकणांतून निघाले व सोलापुरप्रांतीं त्यांस थारा मिळाल्यामुळें तेव्हांपासून आमच्या घराण्यानें सोला-पुर इलाखा हेंच आपलें कोंकण करून घेतलें. माझ्या आईनें ' बाबू, आपण कोंकणस्थ बरें !' असें मुके घेतघेत जर मला लहानपणीं बजावलें नसतें तर मोठा झाल्यावर ' मी कोंकणस्थ आहें ' असें ह्मणण्याची निदान मलातरी छाती झाली नसती. परंतु माझ्या मातेच्या त्या बजावण्याचा माझे मनावर दृढ संस्कार झाला व आपण कोंकणस्थ हें माझ्या मनांत पक्कें बिंबलें.

आपल्या कोंकणस्थपणाची जाणीव असलेलीं कितीतरी कोंकणस्थ कुटुंबें महाराष्ट्रांत आहेत. परंतु माझ्या मनावरमात्र तिचा विलक्षण परिणाम झाला. लहानपणापासूनच मला कोंकणांत प्रत्यक्ष जाण्याची उत्कंठा लागली व ही उत्कंठा तृप्त केल्यावांचून माझे जिवास चैन पडणार नाहीं हें मला पक्कें समजून चुकलें. वास्तविक माझें कोंकणांत कांहीं ' गांटोडें ' पुरलेलें होतें असें नाहीं. कोंकणांत आमचे जर कांहीं नातलग पूर्वी असतील तर त्यांनीं तें नातें विस-रल्यास आतां इतका काळ लोटलेला होता कीं, मी कोंकणांत गेल्यापासून माझे-विषयीं प्रेम अथवा भाऊबंदकी वाटण्याजोगें त्यांचे मनांत कांहींच राहिलेलें नव्हतें. पण तरीही कोंकण मला एकसारखें आपल्याकडे ओढून घेत होतें व मला पैसे मिळूं लागल्याबरोबर मी कोंकणांत जाणार असा पक्का बेत मी आपल्या मनाशीं करून ठेविला होता. महाराष्ट्रांत कर्तेसवरते तरुण पुरुष वकील, डॉक्टर, मामलेदार, एडिटर, बँकेचे मॅनेजर, विमेवाले, अथवा एखाद्या कंपनी-तील प्रसिद्ध पात्र, ह्यांपैकींच कांहींतरी एक असावयाचे असा ठरीव नियम आहे, तेव्हां मी एका प्रसिद्ध विमाकंपनीचा मुख्य एजंट होऊन माझ्या सांसारिक आयुष्यास आरंभ केला असें सांगितलें असतां कोणास आश्चर्य वाटणार नाहीं. मी जरी प्रत्यक्ष बी. ए. झालों नव्हतों तरी माझें इंग्रजीचें अध्ययन चांगलें होतें व विमाकंपनीस योग्य अशी हुषारी माझे अंगीं असल्यामुळें मला माझ्या कामांत चांगली प्राप्ति होऊं लागली होती. आमच्या कंपनीचें हेड आफिस अर्थात्च मुंबई येथें होतें व त्या निमित्तानें मला कधीं कधीं

मुंबईस जावें लागत असे. कोंकण पाहून येण्याची जिज्ञासा तृप्त करण्यास मुंबईची खेप ही चांगलीच प्रस्तावना होती.

एप्रिल महिन्याचा आरंभ म्हणजे अनेक भिन्न भिन्न परिस्थितींच्या जंक्शनचें स्टेशनच असें म्हटलें पाहिजे. एप्रिल १ ले तारखेस बऱ्याच दृश्यमान परिस्थितींचा वेग थांबून ज्या नूतन परिस्थितींतून मनुष्यांचा प्रवास पुढें व्हावयाचा असतो त्यांचें पूर्वदर्शन त्यांस होऊं लागतें. रेल्वेच्या अनेक लाइनी ज्या स्टेशनवर एकत्र मिळालेल्या असतात तेथें एखादा नवखा मनुष्य गेला असतांना तो जसा भांबावून जातो त्याप्रमाणें पुष्कळ विसदृश परिस्थितींचा एप्रिल महिन्यांत संयोग होत असल्यामुळेंच कीं काय एप्रिलच्या १ ल्या तारखेस ' वेडावलेल्या लोकांचा दिवस ' असें म्हणण्याचा इंग्रज लोकांत परिपाठ आहे. एप्रिलमध्यें खरोखरच सर्वांस वेड लागतें. थंडीच्या कुडकुडणाऱ्या दिवसांत जोरानें लागणाऱ्या मास्तरच्या छडीमुळें जिकिरीस आलेले शाळेंतील विद्यार्थी एप्रिल लागला कीं पुढें लवकरच सुरू होणाऱ्या मोठ्या सुटीच्या कल्पनेनें वेडे होऊं लागतात. नवपरिणीत युवयुवती सुखकर चन्द्रिकेच्या मनोहर अनुभवलालसेनें खुळीं बनतात. चन्द्रकलेची परवा न करणारे पण आपल्या ' वनितावस्त्रभांडारां'त चंद्रकलांचा मोठा सांठा ठेवणारे व्यवहारकुशल दुकानदार ' लग्नसराईंत आपला माल पुष्कळ खपणार ' ह्या आशेनें वेडे बनतात. मोत्यांच्या व्यापाऱ्यांना, न चमकणाऱ्या मोत्यांस तजेलदार पाणी देण्याचें, वेड लागतें, व सुवर्णकारांना हीणकस दागीनेसुद्धां शंभर नंबरी सोन्याचे म्हणून दाखविण्याचें वेड उत्पन्न होतें. उन्हाळ्याची धास्ती घालून आपलें ' थंडाई चूर्ण ' खिसे गरम करण्याच्या कामीं उपयोगी पडेल तर पहावें अशा आशेनें कित्येक ' हकीम ' वेडे होतात व ताडाच्या पानांना किंवा कागदाच्या चुर्णांना ' पंखे ' हें बहुमानसूचक नांव देण्याचें कित्येक धाडसी लोकांस वेड लागतें. आमराईच्या मालकांना झाडांवर हेलकावे खात असलेल्या कैऱ्यांनाच पाहून वेडाचा झटका येतो व ' आतां दुधास भाव येणार ' ह्या कल्पनेनें वेडावून जाऊन गवळी लोक म्हशीचें दूध कमी भरलें कीं पाण्याच्या रांजणांनाच दोहूं लागतात. वकीलांचे पक्षकार ' खटल्यांच्या ' तारखा लांबणार ' म्हणून वेडे होतात व ' आतां एखाद्याचा पक्ष घेऊन भांडूं

ह्मटलें तर कोर्टच बंद ' म्हणून वकील लोकांना दुःखाचें वेड लागतें. फांशी देऊन देऊन थकलेले जज्ज कोर्टाच्या बाहेरची हवा थोडे दिवसतरी अनुभवावयास सांपडेल अशा आनंदानें वेडे होतात व लौकरच फांशी जाणारे कैदी चार दिवस तुरुंगाची हवा ज्यास्त खावयास मिळेल म्हणून वेडे बनतात. वसंतोत्सवाचे प्रेक्षक चार घटका मौजेंत घालविण्याच्या उत्सुकतेनें वेडे होतात व वर्तमानपत्रांचे संपादक 'पेपर'ला मनमुराद मजकूर मिळून टांक घासण्याचा त्रास चार दिवस तरी वांचेल म्हणून वेडे होतात. धान्य विकून आलेल्या पैशाच्या गांठोड्याकडे पाहून शेतकरी लोक वेडे बनतात व कुळांकडील पैसेवसुलीची उत्तम संधि हीच म्हणून सावकार लोक वेडे बनतात. उंसाच्या यातना पाहून आश्रुपूर वाहविणाऱ्या चरकास दुःखानें वेड लागतें व वसंतपूजेकरितां जमलेल्या विप्रवर्गास रसपानाची रसभरित कल्पना वेडे करीत असते. ओल्या कणसांवर चार दिवस ताव मारलेल्या 'पोवळ्या' स नांगराचें जड जूं दिसावयास लागून वेड भरतें व मालकाबरोबर शिकारीस जावयास सांपडेल अशा आनंदाच्या भरांत 'मोत्या' वेडानें नाचूं लागतो. अशा रीतीनें एप्रिल महिन्यांत सर्व विचारमय जगती विराम पावून वेडावलेल्या दुनियेस आरंभ होतो, व ह्या इतक्या वेड्यांच्या संगतीचा संपर्क लागल्यामुळेंच कीं काय वसंतरूपानें सुखमय वेष प्रावरण करणाऱ्या निसर्गदेव-तेसही वेड लागून ती ग्रीष्मऋतूंत तापदायक होत असते ! एप्रिल महि-न्यापासून वेडेपणाच्या युगास जर प्रारंभ झाला नसता तर जगांतील पुष्कळ उलाढाली मुळींच झाल्या नसत्या. प्रवास हीही जगांतील एक मोठीच उलाढाल आहे. कारण कन्याकुमारीजवळील लोकांना पेशावर पहावेसें वाटणें व पेगूंतील लोकांना बंगलोरच्या हवेची मौज अनुभवण्याची इच्छा होणें ह्यांत कितितरी त्रास आहे ! परंतु एप्रिल महिन्यांत जी सररहा एका जंगी वेडाची लाट येत असते तिच्यामुळें ह्या त्रासांतील दगदग अगदीं शून्य होऊन तिच्यावर एक अत्यंत मोहक अशी एक जादू पसरली जाते. ह्या जादूच्या झपाट्यांत मनुष्य आपल्या सुखमय घरादारास सोडून ट्रंकवळकटी घेऊन धांवूं लागतो. आपल्या शरीरास किती कष्ट पडतील, आपला पैसा किती खर्च होईल, आपल्या इष्टमित्रांचा किती दिवस वियोग घडेल, आपल्या धंद्यास किती दिवस व्यत्यय येईल, व नवीन सृष्टींततरी आपल्या कल्पनेचे आपणास सर्व आनंद लाभतील कीं नाहीं ह्याचें

त्या वेडाच्या लहरींत त्यास भानच रहात नाहीं. उन्हाळ्यांत आपण चार दिवस अमुक स्थळीं घालविणार हा एकच बलवत्तर विचार त्यास तल्लीन करीत असतो व ह्या तल्लीनतेच्या भरांत पूर्वेचें जग पश्चिम दिशेला, पश्चिमेचें उत्तर दिशेला, व उत्तरेचें दक्षिण दिशेला असें सर्वत्र परिभ्रमण सुरू होऊन कोणाचेंही शरीर ठिकाणावर नाहींसें होतें. चित्त जागीं नसल्यावर शरीर ठिकाणावर नसल्यास आश्चर्य काय ?

एप्रिल महिना सुरू झाल्यापासून माझेही मनांत कोंकणांत जाण्याची माझी इच्छा यंदा पूर्ण करावी असें आलें व त्याप्रमाणें मुंबईस जाण्याचा प्रसंग आल्याबरोबर तसाच पुढें कोंकणाकडे मोर्चा वळवावा असें मीं ठरविलें. माझें मुंबईस जाण्याचें कामही लवकरच निघालें. मुंबईस माझे मित्र 'सेठ' डाह्याभाई दीपचंद ह्यांचा मल-बार हिल्‌वर बंगला असल्यामुळें मुंबईस कोठें उतरावें ह्याची मला कधींच पंचाईत पडत नसे. मुंबईतील रहाणी दुःसह अशी ओरड मीं अनेक वेळां ऐकलेली आहे, परंतु ' सेठ ' डाह्याभाईच्या हवाशीर, मोकळ्या, विस्तीर्ण व सर्व साधनोपसाधनांनीं अलंकृत अशा बंगल्याच्या सहवासामुळें मला मुंबई कधींच असह्य वाटली नाहीं. परदुःख शीतळ आहे असें ह्मणतात, पण मला परदुःखच केवळ शीतळ नसून ' सेठ ' डाह्याभाईचा बंगलाही फारच शीतळ वाटत असे. एका गोष्टांत मात्र मला मुंबई असह्य होत असे आणि ती ही कीं, सेठ डाह्याभाईच्या मोटरमधून आमच्या कंपनीकडे ऐटीनें जातांना मोटार ठेवण्याचें सामर्थ्य अंगीं नसलेली माझी स्वतःची दुबळी स्थिति मला पुन्हां पुन्हां आठवे. सोलापूर येथील नव्या पेठेंत डॉ. भातुकले ह्यांच्या समोर असलेला माझा स्वतःचा बंगला तेथील लोकांच्या मनांत हेवा उत्पन्न करीत असे, व त्या वेळीं मी मोठा ' पैसेवाला ' आहे असा मलाही कधीं कधीं भ्रम होत असे. परंतु मुंबईतील मोटारी, वीज, टेलीफोन वगैरे पाहून त्यांच्या उपभोगामुळें आनंद व पूर्व स्थितीशीं विरोध असे दोन मनोविकार एकदम अद्‌भुत होऊन माझी अनुकंपनीय रीतीनें ओढाताण करीत असत.

समुद्राचा आतांपर्यंत मीं कधींही प्रवास केला नव्हता. समुद्राची आणि माझी आजपर्यंतची ओळख ह्मणजे बॅक्‌बेवरून चालतांना त्याच्या ज्या लाटा माझ्या

स्वागतार्थ उचंबळून येत तितक्यांवरूनच होती. संध्याकाळचे प्रहरीं आपला सुखकर अनिल माझे दिमतीस ठेवून मोठ्या सौम्य रीतीनें माझे श्रमपरिहार करण्यांत उद्युक्त झालेल्या समुद्रास पाहून त्याच्या शिष्टाचारिपणाविषयीं माझें फारच अनुकूल मत झालें होतें. ह्या समुद्राइतका भला, संभावित, परोपकारी व सुस्वभावी दुसरा कोणीही नसेल अशी माझी पक्की खातरी झाली होती. स्वतःचे शरीरांतील सर्व रस आटले तरी हरकत नाहीं, परंतु पृथ्वीच्या कोनाकोंपऱ्यापर्यंत जे गरीब कुणबी लोक कृषिकर्मामध्यें गुंतलेले आहेत त्यांच्या हितार्थ नभोमंडळांतील मेघांच्या तुंबड्या भरून देणारा जो हा समुद्र त्यासारखा ' स्वसुखनिरभिलाष ' खरोखर कोणी तरी असेल काय ? उषादेवीचें हास्य, बालरवीचें आरक्त किरण, इन्द्रधनुष्याची बहारीची शोभा व चन्द्रिकेचें अप्रतिम लावण्य हें नेहमीं अवलोकन करीत असूनही एखाद्या सत्त्वधीर पुरुषाप्रमाणें जो आपल्या स्थानापासून लवमात्रही ढळत नाहीं त्याच्या सद्गुणाचें किती वर्णन करावें!. वसुंधरेनें केवळ आपल्या पृष्ठभागावरच जीवांना जागा दिलेली आहे, परंतु आपल्या उदरांत व पृष्ठभागावर अशा दोन्हीं ठिकाणीं ज्यानें प्राणिवर्गास वावरावयाची मोकळीक ठेवलेली आहे त्याचा मोठेपणा किती ह्मणून सांगावा ! आणि इतकें असूनही त्याचा स्वभाव किती तरी कोमल ! जमिनीवरून चालतां चालतां मनुष्यास किती ठिकाणीं खांचाखळगे लागतात ! किती ठिकाणीं तो ठेंचा खातो ! निर्दय पृथिवीवरून चालतांना पायांचें ' भदें ' होऊं नये ह्मणून पावलांकरितां कातड्यांचें वेष्टन तयार करण्याचे कामीं कितीतरी चर्मकारांचे टांके ढिले होतात ! परंतु समुद्रावर तसा कांहीं त्रास आहे काय ? नाहीं, मुळींच नाहीं. समुद्रावर पहावें तों सर्व कांहीं गुळगुळीत. त्याच्यावर माणसानें खुशाल निजून प्रवास करावा. संसारशकट चालविण्याकरितां निदान दोन चाकेंतरी नेहमीं लागतातच. कधींकधीं एकचाकी गाड्याही आढळतात, पण पृथिवी ह्मटली कीं चाक हें असलेंच पाहिजे. समुद्रावर तसें कांहीं तरी आहे काय ? समुद्रावर प्रवास करावयास चाकांची ह्मणून गरज नाहीं. आपली नांव समुद्रावर फेंकून दिली कीं ती बिनधडक पैलतीरास नेऊन पोंचावयाची. बालकाला झोंप लागावी ह्मणून आई त्यास प्रेमानें डोलवून निजविते. समुद्रही तसाच आहे. मधून मधून मंद मंद ऊर्मि उत्पन्न करून हा

कितीतरी प्रेमानें प्रवाशांना आपल्या अंकावर डोलवीत असतो ! मनुष्याचे अंगीं एखादा गुण असला ह्मणजे त्याचा ‘ देखावा ’ करण्याची त्यास फार हौस असते. परंतु हा समुद्र कितीतरी निगर्वी ! वास्तविक पहातां मेघांतील मधुर जल ह्मणजे मूळचें समुद्रांतीलच पाणी होय. पण आपल्यावर माधुर्याचा आरोप येऊन आपली जगभर प्रसिद्धि होऊं नये ह्मणून ह्या लाजऱ्या समुद्रानें मधुरपणाचें सर्व श्रेय मेघांना देऊन टाकलें व अप्रिय असा खारटपणामात्र आपले अंगीं घेतला ! परंतु ह्याचा खारटपणासुद्धां कधीं कोणास बाधक झाला आहे काय ? नाहीं. ह्याच्या खारटपणामुळें मानवांचे अन्नांत रुचिच उत्पन्न झाली आहे. ह्याच्या क्षार उदकामध्यें निवास करणारे मत्स्यादि प्राणीसुद्धां कधीं दुःखांत असलेले आढळत नाहीं. उलट ते जेव्हां जेव्हां जमिनीवर येण्याचा प्रयत्न करितात तेव्हां मात्र तत्काळ गतप्राण होतात. ज्यांना मनुष्यांपासून उपद्रव पोंचण्याचा संभव आहे अशा दुर्बळ प्राण्यांना आपल्या पिलांप्रमाणें ह्या मायाळू सागरानें पोटाशीं घट्ट धरून ठेवलेलें आहे, इतकें कीं समुद्रोदरांत किती प्राणी आहेत ह्याचा मानवांना अजून पत्तासुद्धां लागलेला नाहीं. पृथिवीच्या पोटीं सुंदर रत्नें आहेत ह्मणून तिला ‘ वसुंधरा ’ असें ह्मणतात. परंतु सागराचे पोटांतही नुसते खेंकडे आणि मासे नसून अनंत रत्नें भरलेलीं आहेत. निःसंग निरंजनांसही मोह पाडणारी लक्ष्मी ज्या सागरांतून निर्माण झाली त्याच्या अंगीं अलौकिक रत्नें प्रसविण्याचें किती सामर्थ्य आहे हें निराळें सांगावयास पाहिजे काय? पृथ्वीचे उदरांतील रत्नें बाहेर काढण्याकरितां कोणास फारसे परिश्रम पडले नाहींत, परंतु सागरोदरांतील रत्नांचा लाभ करून घेण्याकरितां देव व दानव ह्यांना कितीतरी परिश्रम पडले ! देव व दानव ह्यांचें एकमेकांशीं ‘ जालिम ’ वैमनस्य असतांना समुद्रमंथनाच्या महत्कार्याकरितां ते परस्परांचे साहाय्यकर्ते झाले, तेव्हां जगांतील द्वेषभाव नाहींसा करून सर्वत्र विश्वबंधुत्व प्रस्थापित करण्याची प्रत्येक धर्मपुरस्कर्त्याची हांव प्रथम समुद्रालाच पुरी करितां आली असेंच ह्मणावयास नको काय ? बरें, जगामध्यें शांतता नांदविण्याचें त्यानें आपलें व्रत तेव्हांपासून सोडून दिलें आहे असेंही नाहीं. कारण, व्यापार ह्मणा, शोध ह्मणा, अथवा जिज्ञासा ह्मणा, ह्यांमुळें अमेरिकेचा मनुष्य झांजिबारमध्यें व जपानचा मनुष्य आमस्टरडामध्यें नेऊन सर्व मानवजातीचा एकमेकाशीं परिचय जोडण्याचें काम तेव्हांपासून हा सागर करीतच आला आहे. पृथ्वीचे सांधेसांधे व कोंपरेकोंपरे जर समुद्राच्या जगड्व्याळ

वारिशृंखलेनें परस्परांशीं जोडले नसते तर ह्या जगामध्यें एकाचा एकाला पत्ता लागला असता कीं नाहीं हा संशयच आहे. इतकेंच काय, पण ज्याप्रमाणें मुंबईतल्या चाळी एकावर एक माणसांची उतरंड रचून स्थानैक्यामुळें शेंकडों माणसांचें अन्योन्यसंघटन घडवून आणतात त्याप्रमाणें हा सागरही तळमजल्यावर मत्स्यादि प्राणिवर्ग व पृष्ठभागावर मनुष्यांनीं गजबजलेलीं गलबतें ठेवून सर्व विश्वाच्या एकीकरणार्थंच कीं काय स्वतःस एखाद्या भव्य चाळीची शोभा आणीत आहे! विश्वबंधुत्वाकरितां ह्यानें आणखी खटपट ती काय करावयाची?

मीं समुद्राचा प्रवास कधीं केला नव्हता हें मागें सांगितलेंच आहे. परंतु समुद्राचें एकंदर महत्त्व, त्याची परोपकारनिरति, त्यानें अंगीकृत केलेलें श्रेष्ठ कार्य, व त्याची परम शोभा, ह्यांचा विचार मनांत येऊन, कोंकणाच्या प्रवासाच्या निमित्तानें ह्या मानवजातीच्या कळ्या मित्राशीं आपला कांहीं काळ सहवास होणार ह्याचा मला अत्यंत आनंद वाटला. मी दुसरे दिवशीं मुंबईहून निघणार होतों. देशांतील माणसें कोंकणांत नेऊन सोडण्याच्या उत्कट महत्त्वाकांक्षेनें ज्या अनेक आगबोटी एकमेकींशीं कसून स्पर्धा करीत असतात त्यांपैकीं **उषा** ह्या अगदी नविन आगबोटीनें मीं प्रवास करण्याचें ठरविलें. जे परम कारुणिक लोक जगांतील व्याधि कमी व्हाव्या ह्मणून अत्यंत परिश्रमानें "अचूक गुणकारी" औषधें तयार करीत असतात त्यांपैकीं एकाच्या 'औषधालयांत' जाऊन मी "आगबोट--पीडा--हरणा" ची एक बाटली विकत घेतली. "आगबोट--पीडा--हरण" हें एक प्रकारचें हरिण असावें अशी माझी अनेक दिवस समजूत होती. परंतु मुंबईत शोध करितां आगबोटीवर कोणताही त्रास होऊं नये ह्याकरितां हिमालयांतील एका दिव्य पुरुषानें हें औषध तयार केलें असून त्याच्या त्यानें प्रत्येक बंदराच्या गांवीं एजन्सी ठेवलेल्या आहेत असें कळलें. हिमालयांतील सत्पुरुष आतां नुसतें नाकच धरून न बसतां निदान औषधें तयार करण्याचें तरी काम करूं लागले आहेत ह्याबद्दल कित्येक लोकांना आनंद होईल ह्यांत शंका नाहीं.

दुसरे दिवसाच्या काल्पनिक आनंदानें माझा संध्याकाळचा वेळ केव्हांच निघून गेला. माझ्या मित्रास रात्रीं जेवल्याशिवाय गप्पा मारण्यास वेळच मिळत

नसे, परंतु त्या वेळीं गप्पागोष्टी केल्याशिवायमात्र त्यांना चैन पडत नसे, आणि त्यांत एखादा माझेसारखा विश्वासांतील मित्र मिळाल्यावरतर त्यास तास दीडतास गप्पांत गुंतवल्यावांचून त्यांना राहवावयाचेंच नाहीं. माझा भावी प्रवास माझे मनांतील एक बलवत्तर विषय असल्यामुळें अर्थात्च त्या रात्रीं त्यासंबंधींच गोष्टी निघाल्या. ' सेठ 'नीं माझ्यापेक्षां पुष्कळच ज्यास्त प्रवास केलेला होता. कांहीं वर्षांपूर्वी सर्व जगांतील व्यापाऱ्यांची जी जंगी कांग्रेस विल्टन् येथें भरली होती त्यांत ' सेठ ' ना मुंबईचे प्रतिनिधि ह्मणून जावें लागलें होतें. नेटल, शांघाय, केरो वगैरे ठिकाणीं शेटजींचीं दुकानेंच होतीं व दर वर्षीं कोणत्याना कोणत्यातरी समुद्रपर्यटनास त्यांना जावेंच लागे. डुंगणाशीं असलेल्या कोंकणाविषयीं माझी इतकी आतुरता व मनाची धांदल पाहून शेटजींना मनांतल्या मनांत खूपच हंसूं येऊन ' दक्षिणी ' लोकांच्या सहसीपणाविषयीं अनुकंपाही उत्पन्न झाली असेल. पण तें उघडपणें दाखविण्याइतके ते अनुदार नव्हते. त्यांनीं माझ्याशीं अगदीं मोकळ्या दिलानें भाषण केलें व समुद्रप्रवासाच्या कित्येक मनोरंजक हकीकती मला सांगून निजावयास जाण्याचे वेळेपर्यंत माझीं मनोराज्यें त्यांनीं ज्यास्तच रंगाविलीं.

जेथून माझे पूर्वजांचे पूर्वज अनेक वर्षांमागें देशावर निघून आले तेथें अगदीं थोडक्या काळांत मी पुन्हां पाय ठेवणार, माझ्या त्या प्राचीन आजोबांच्या पवित्र चरणांनीं ' पुनीत ' झालेल्या जागेस मी पुन्हां स्पर्श करणार, माझ्या वाडवडिलांनीं वियोगाचे सुस्कारे टाकीत जिचा केवळ प्रतिकूल परिस्थितीमुळें परित्याग केला तिलाच मी आनंदाच्या अश्रुभरांत अनुकूल परिस्थितीच्या कृपेमुळें पुन्हां पाहण्याचा यत्न करणार, अशा एकापेक्षां एक, मनोवृत्ति उचंबळून सोडणाऱ्या, विचारांत मी निमग्न असतां निद्रादेवीनें आपली गोड ' गुंगी ' मला दिली व ' अमुक पाहीन ' ' तमुक पाहीन ' असे बेत करणाऱ्या माझ्या नेत्रांनीं आपलीं तावदानें हळूच लावून घेतलीं.

माझे नेत्र मिटून मी निद्रित झाल्यासारखा झालों खरा, परंतु वास्तविक पहातां मला खरी निद्रा न येतां माझी एक दुनिया संपून दुसऱ्या दुनियेस आरंभ झाला. ज्याप्रमाणें विजेच्या दिव्याचें बटन दाबल्याबरोबर निबिड अंधकाराचे

जागीं लखलखीत प्रकाश पडतो त्याप्रमाणें माझ्या पापणीचें पातें पापणीवर टेंकल्याबरोबर निराळ्याच प्रकाशमय सृष्टींत जाऊन पडल्यासारखें झालें. मनुष्याचे जागेपणांत त्याचे डोळे उघडे असतांना तो अंधकारांतच कसा लुडबुडत असतो व डोळे मिट-ल्यावर त्यास लखलखदिशीं उजेडाचा कसा अनुभव येतो ह्याचें ज्ञान त्या दिवशीं मला झालें. ही उज्ज्वल देदीप्यमान सृष्टि मीं आजपर्यंत कधींही पाहिलेली नव्हती. मीं आजपर्यंत एका गांवाहून दुसऱ्या गांवीं प्रवास केला होता, परंतु प्रवास केल्या-वांचून एका सृष्टींतून दुसऱ्या सृष्टींत मी कधीं गेलों नव्हतों. मीं आजपर्यंत अनेक आनंद अनुभवलेले होते, परंतु आज ज्या एका अवर्णनीय तऱ्हेचा आनंद मला झाला तसल्या आनंदाची रुचि मला कधीं मिळालेली नव्हती. संध्याकाळ-पासून ज्या एका आनंदाच्या ठोक्यांना गति मिळाली ते निरनिराळ्या प्रसंगांत तसेंच चालू राहून त्यांची परिणति आतां येथपर्यंत झाली. आनंदाचें घड्याळ हें एक मोठें चमत्कारिक यंत्र आहे. त्यास एकदा चावी मिळाली म्हणजे तें थांबा-वयाचें म्हणून नाहीं. त्या प्रकाशमय नूतन सृष्टींत जरी मी आनंदस्तिमित होऊन गेलों होतों तरी प्रत्येक प्रकारची जाणीव माझे अंगीं कायम होती व ह्या जाणिवी-मुळें त्या सृष्टींत घडत असलेल्या सर्व गोष्टी मला नीट रीतीनें समजत होत्या. आनंदाच्या नवीन नवीन ऊर्मींमुळें माझें चित्त जरी एकसारखें आंदोलन पावत होतें तथापि त्यांतही एक प्रकारचें स्थैर्य—एक प्रकारचें सातत्य—कायमच होतें. माझ्या नवीन अंतःसृष्टींत एकसारखी घडामोड चाललेली होती, तथापि त्यांतही एक प्रकारचें व्यवस्थित सहेतुकत्व दृग्गोचर होत होतें. कमालीचा उजेड, कमालीचा प्रकाश, कमालीची उज्ज्वलता हें त्या अंतःसृष्टीचें स्वरूप होतें. अशा प्रकारची रोषनाई एकाद्या सम्राटाच्या विवाहांत, विजयप्रसंगांच्या उत्सवांत अथवा महा-कवीच्या कल्पनाप्रतिभेंतसुद्धां कधीं दृग्गोचर व्हावयाची नाहीं.

परंतु एक प्रकारचा अनंत प्रकाश जरी माझ्या नूतन सृष्टींत मला दिसत होता तथापि एकाएकीं त्याच्यावर अंधकाराची मलिनता मला भासूं लागली व त्या बरोबर माझ्या अंतःकरणांत चर्र झालें. ज्याप्रमाणें आम्रफलाच्या मधुर रसांत मन तल्लीन झालें असतां एकदम कवठाचा खवटपणा उत्पन्न व्हावा, त्याप्रमाणें त्या मलिनतेचा मला विषाद वाटला. परंतु ह्या विषादाला वास्तविक पाहतां कांहींएक कारण नव्हतें. कारण ती

मलिनता खरोखरीची नसून अगदी कृत्रिम होती. ज्याप्रमाणें पर्वतीच्या पायऱ्या चढून गेलें ह्मणजे नदीवरील घाटाच्या पायऱ्यांचें कांहीं विशेष वाटत नाहीं, ज्याप्रमाणें गव्हर्नरची स्वारी आली ह्मणजे मामलेदारसाहेबांचें प्रस्थ मावळून जातें, ज्याप्रमाणें महापंडिताचें आगमन झालें ह्मणजे शाळामास्तराच्या विद्वत्तेचें तेज मावळतें त्याप्रमाणें ज्या तेजोमय जगतामध्यें मी संचार करूं लागलों होतों त्यावर मालिन्य दिसूं लागण्याचें कारण त्याचेपेक्षांही अत्यंत तेजःपुंज अशी आकृति त्या तेजःप्रांतांत एकदम अवतीर्ण झाली. **ही येथें उभी असलेली आकृति कोण ?** असा विचार माझे मनांत साहजिकपणेंच उभा राहिला, पण त्याचेपूर्वीच माझ्या हातांनीं तिचेपुढें अंजलि जोडली व माझी जिव्हा ' नमो नमो ' असे भक्तिप्रवण उद्गार तत्क्षणीं बोलून गेली. त्या आकृतीकडे पाहतां पाहतां माझी तहान भूक सर्व हरली, किंवा ज्यास्त सत्य वर्णन करावयाचें ह्मटलें ह्मणजे माझ्या गात्रांना त्या मोहक रूपाची इतकी तहान लागली कीं जगाच्या अंतापर्यंत मी तिचेकडे पहात राहिलों तरी माझी तृषा शांत होणार नाहीं असें मला वाटलें. वास्तविक पाहतां तेजोमय भूमींत तेजस्वी वस्तु तेजस्वी दिसत नाहीं. तेजांत तेज लोपून जाऊन नवीन तेजाची व्यक्तता नाहींशी होते. परंतु त्या तेजाचें तसें झालें नाहीं. त्या तेजोमय प्रांतांतही त्या तेजस्वी मूर्तीचें तेज इतकें स्पष्ट दिसत होतें की त्यांतील रेषारेषा, त्यांतील छटाछटा, त्यांतील कलान् कला मला स्पष्टपणें ओळखूं येत होती. ती आकृति प्रकट होऊन कांहीं निमिषें झालीं नाहींत तों माझ्या हृदयांतील आवेग इतका तुफान झाला कीं, माझें हृदय विदीर्ण होऊन त्याचीं दोन शकलें होतात कीं काय असें मला वाटलें. खरोखर त्या आकृतीच्या पायीं माझ्या पंचप्राणांचा नैवेद्य मला अर्पण करितां आला असतां तर मी स्वतःस किती धन्य मानलें असतें ! त्या आकृतीचे चरणीं वाहण्याकरितां माझ्या शरीरांतील पांची तत्त्वें जर पुष्पमय झालीं असती तर मला किती कृतार्थता वाटली असती ! त्या आकृतीच्या पावलांचे रजःकण बनण्याकरितां माझें मातीचें शरीर जर पुन्हां मृत्तिका बनलें असतें तर मला केवढें जन्मसाफल्य लाभलें असतें ! धन्य तो क्षण, धन्य तें स्मरण, धन्य तो तेव्हांचा प्रसंग !

ही आकृति कोण ? ही माझ्याजवळ उभी कां ? ही मला कोणता बोध

करण्याकरितां येथें आली आहे ? हिच्या आगमनावरून मी काय समजूं ? माझ्या पुण्यांश सर्व एकवटून त्याचा हा मधुर परिपाक झाला असें मी समजूं कीं माझी पातकें असह्य झाली ह्मणून मला तत्काल दग्ध करण्याकरितां हें तेज प्रदीप्त झालें असें मी मानूं ? मी हिचे चरण धरून हिचेजवळ काय सांगू ? आपल्या क्रोधाचा प्रसार आवरून धर असें तिला विनवूं की मला अनाहूत दर्शन दिल्याबद्दल तिचे उपकार मानूं ? मी करूं तरी काय ? माझ्या मनांतील हा गोंधळ कसा जाईल ? मी काय केलें असतां ह्या दिव्य मूर्तीचें हृद्गत मला कळेल ? ह्या अवस्थेमध्यें ही मूर्तिच मला धीर देईल काय ?

माझ्या मनांत असे संशयाचे कल्लोळ उठत असतांनाच त्या आकृतीनें माझे निटिलावर हात ठेवले व अत्यंत प्रेमपूर्ण नजरेनें माझेकडे पाहून माझ्या क्षुब्ध हृदयावर शीतल अमृताचें सिंचन केलें. मला थोडीशी हुषारी आली व आतां कांहीं तरी बोलण्याचा मी प्रयत्न करणार तोंच त्या तेजस्वी मुखांतून पुढील उद्गार बाहेर पडले—मनोहर, ज्या उत्कृष्ट हौसेनें हृदयाचें आंदोलन केल्यामुळें तूं येथवर आलास ती हौस फार चांगली आहे. वाडवडिलांचा इतका अभिमान धरणाऱ्या तुझ्यासारख्या व्यक्ति फार थोड्या असतात. पूर्वजांविषयी अत्यंत उत्कट अभिमान जर ह्या हिंद-भूमींत तुझ्याप्रमाणें प्रत्येकाच्या मनांत जागृत राहता तर हिंदुस्थानचा इतिहास फार निराळ्या तऱ्हेनें लिहिला गेला असता. काल हा अनंत आहे व त्याचा फारच थोडा वांटा—वांटा कसला, त्यांतलि एका परमाणूचा परमाणु—मनुष्यास एका जन्मांत प्रत्यक्ष पहावयास सांपडतो. त्या परमाणूच्या मागील परमाणु त्यास अदृश्य असतो व त्या परमाणूच्या पुढील परमाणूवरही त्याच्या दृष्टीस अत्यंत दुर्गम असा अंधकार असतो. जर कालाच्या एका परमाणूबरोबर मनुष्याचें कर्तव्यक्षेत्र संपतें तर मागील व पुढील परमाणु—भूत व भविष्यकाल—घडून गेलेल्या व घडून येणाऱ्या गोष्टी—इतिवृत्त व भवितव्यता—ह्यांचें ज्ञान करून घेण्याची त्यास कांहींच अवश्यकता उरली नसती. परंतु वर्तमान कालाबरोबर मनुष्याची कर्तव्यमर्यादा संपत नाही. त्यास मागें पाहून व पुढचें धोरण ठेवूनच नेहमीं वागावें लागतें भविष्यकालाचें परिज्ञान करून घेणें मनु-ष्याच्या हातचें नाही, कारण मनुष्याची बुद्धि अत्यंत आकुंचित, दृष्टि अल्प व ज्ञान

परिमित आहे. परंतु ह्यास एक उपाय आहे आणि तो हा कीं, त्यानें भूतकालीन गोष्टींचें पूर्ण आकलन करून घ्यावें. नुसता वर्तमान कालाचा कंदील तमोव्याप्त अशा भविष्य कालावर उजेड पाडण्यास समर्थ नाहीं. परंतु भूतकालाचा दीप व वर्तमानकालाचा कंदील हे दोन्ही एकमेकांशीं जोडून ठेवले कीं, त्यांचा एकवटलेला प्रकाश, भविष्यकालाचा बराचसा भाग स्पष्ट दिसूं लागेल असें करतो. मनुष्यानें पूर्वजांचा अभिमान धरला पाहिजे ह्याचें कारण हें असें आहे. त्यांत कांहीं विशेष सद्गुण आहे अशांतील भाग नाहीं, किंवा त्यामुळें पूर्वजांवर तो विशेष उपकार करीत असतो असेंही नाहीं. मनुष्यानें आपली पूर्व परंपरा पाहणें ह्यांत त्या परंपरेवर उपकार तो कसला ? परंतु जिना चढत असतांना आपण किती पायऱ्यांपर्यंत आलों हें पाहणें मनुष्यास अवश्यच असतें. त्यांत मागील कोणत्याही पायरीवर कसलाही प्रकारचा उपकार होतो असें नाहीं. जी पायरी चढली गेली ती गेलीच. त्या जुन्या पायरीवर तुह्मी उपकार तो कसला करणार ? परंतु तिच्याकडे जर तुह्मीं न पाहिलें तर तुह्मी सध्यां कोठें आहां ह्याचें तुह्मांस गणितच करितां यावयाचें नाहीं. मनुष्याची बुद्धि बहुधा तिरपागडी असते. त्यास जो बोध ह्मणून करावा तो त्यास उगीच गर्विष्ठ बनविण्यास कारणीभूत होतो. सत्यवर्तन, सरल स्वभाव, अहिंसा, अद्वेष, पवित्रता, धैर्य, सद्विचार ह्यांत वास्तविक काय आहे ? ह्या गोष्टी वास्तविक त्याच्या स्वतःच्याच उन्नतीकरितां नाहींत काय ? ह्यांत त्याचें स्वतःचेंच कल्याण नाहीं काय ? पण ह्यांचें थोड्याफार प्रमाणानें आचरण करणाऱ्या मनुष्यांची " आपण फार श्रेष्ठ असून जगतावर मोठा उपकार करीत आहोंत " अशी उलटी भावना होते. दुर्दैवी बिचारे ! बोध हा ज्यांच्या अधःपाताला कारण होतो त्यांच्या फुटक्या नशिबाची आणखी कहाणी ती काय सांगावयाची ? सद्गुणाचें आचरण ह्यांत जगावर उपकार तो काय व्हावयाचा आहे ? ज्याला स्वतःचें हित करणें असेल त्यानें सद्गुणी व्हावें, ज्यास स्वतःचें कल्याण हें ओझें वाटत असेल त्यानें त्याचा मार्ग सोडून द्यावा, पण आम्ही ' उपकार करितों ', ' उपकार करितों,' अशा रीतीनें सद्गुणापुढें नाक खाजविण्यांत अर्थ काय? सद्गुण ही स्वकल्याणाची---स्वतःच्या उन्नतीची---म्हणजे व्यावहारिक भाषेंत बोलावयाचें म्हणजे **स्वार्थाची गोष्ट** आहे व खरोखरी जो स्वार्थी असेल तो सद्गुणाची कांस कधींही सोडणार नाहीं. पूर्वजांचा अभिमान हा एक सद्गुण आहे व आपल्या कर्तव्यप्रवासाची

दिशा चुकूं नये ह्यासाठींच तो अंगीं खिळून जावा लागतो. त्यांत पूर्वजांवर उपकार आहेत असें ह्मणणें ह्मणजे विनाकारण त्यांना हलकेपणा देण्यासारखें आहे. ज्याप्रमाणें चढून गेलेली पायरी मागें राहिली त्याप्रमाणें जे पूर्वी गेले ते निघूनच गेले. तुमचे उपकार घेण्याकरितां त्यांचीं शरीरें येथें आहेत कोठें ? जें नाहीं त्याच्यावर तुह्मीं उपकार करणार काय ? तुम्हांस उपकारच करावयाचे असतील तर जें आहे त्याच्यां-वर तुह्मी उपकार करा. आणि सध्यां काय आहे? तुमचेमात्र देह सध्यां हयात आहेत. तुह्मीमात्र सध्यां जीवमान आहांत. तुमचे मात्रआत्मे ह्या जगांत सध्यां सुखदुःखें भोगीत आहेत. तुमचे पूर्वज येथें नाहींत. ते तुमच्या उपकाराच्या गोळीच्या पार पलीकडे निघून गेलेले आहेत. ह्यासाठीं पूर्वजांचा अभिमान हा जर कोणावर उपकार व्हावयाचा असला तर तो तुह्मांवरच होईल. मनोहर, तूं अशा रीतीनें स्वतःचें हित करण्याकरितां उद्युक्त झाला आहेस ही फार चांगली गोष्ट आहे. पण एखादी चांगली गोष्ट तुला करावयाची असेल तेव्हां ती पुरती चांगली करीत जा. ती अर्धवट करीत जाऊं नको. अर्धे मन त्यांत व अर्धे बाहेर असें केल्यानें तुझ्या प्रयत्नांपैकीं कितीतरी श्रम अगदीं व्यर्थ होतील ! मानवांनो, तुह्मी एखादी वस्तु बाजारांत विकत घेतां तेव्हां व्यापाऱ्याशीं कितीतरी घिसघिस घालतां. त्यानें दहा रुपये मागितले तर तुह्मी पांच रुपये द्यावयास काढतां, त्यानें चार आणे सांगितले तर एक आणा तुह्मी त्याच्या हातावर ठेवतां. आतां असें करण्यांत तुमचा कोणताही गुन्हा नाहीं. कारण खर्च केलेला पैसा सकारण खर्च व्हावा, त्यांतील यत्किंचित् अंशही विनाकारण उडून जाऊं नये अशी तुमची इच्छा असणें अगदी साहजिक आहे. परंतु जो नियम तुह्मी आपल्या धनास लावतां तसाच तो तुह्मीं आपल्या प्रयत्नांना कां लावीत नाहीं ? धनाप्रमाणें प्रयत्नांचीही काळजी घेतली पाहिजे. ज्याप्रमाणें धनाचें पूर्ण फळ मिळावें अशी तुमची इच्छा असते त्याप्रमाणें प्रयत्नांच्याही पूर्ण फलनिष्पत्तीची तुह्मीं मनांत आवड बाळगली पाहिजे. तूं इतक्या हौसेनें आपल्या गांवाहून निघाला आहेस व तुझा उद्देश कोंकणांत जावें असा आहे, परंतु कोंकण कोठें आहे तें तुला माहीत आहे काय ? काय ह्मणतोस ? मुंबई प्रांताच्या पश्चिमेस जी समुद्र किनाऱ्याची लहानशी लंगोटी दिसते तें कोंकण ? वेडारे वेडा ! अरे तूं इतका प्रौढ झालास तरी तुझें विश्वनिवेशनाचें ज्ञान अगदींच

कोतें दिसतें. त्या लहानशा जमिनीच्या तुकड्याला अज्ञानी लोक कोंकण ह्मणोत परंतु खरें कोंकण तें नव्हे. खरें कोंकण निराळेंच आहे आणि तें समुद्र, जमीन, हवा, आकाश ह्या सर्वांच्याहून फार दूर आहे. तेथें जाण्याकरितां ह्या लांकडाच्या व लोखंडाच्या बोटी काय उपयोगी ? तेथें जाण्याकरितां फार निराळ्याच आगबोटी लागतात व त्या तुमच्या मानवी आगबोटींपेक्षां फारच खंबीर असतात. तुझा एक जुना आजोबा ह्या रत्नागिरीच्या मुलुखांत होता ह्मणून कां तूं तेथें निघाला आहेस ? पण, वेड्या, तो फक्त रत्नागिरींतच होता असें तुला कोणीं सांगितलें ? तो रत्नागिरींतच काय पण ह्या पृथ्वीवर जे जे प्रदेश आहेत व जे प्रदेश ह्या पृथ्वीला माहीतसुद्धां नाहींत तेथेंसुद्धां तुझा आजोबा होता. मग तूं ह्या रत्नागिरी प्रांतांतच काय ह्मणून जाणार ? जेथें जेथें तुझा आजोबा होता तेथें तेथें तूं जाईन ह्मणशील तर हा पृथिवीचा सर्व गोल तुला फिरावा लागेल आणि तरीही तुझा प्रवास अपुराच होईल तुझा आजोबा सध्यां कोठें आहे तुला सांगूं ? पण हें सांगितलें तर तूं आश्चर्यानें थक्क होऊन जाशील व पुन्हां त्या चौकशीच्या नादांत तूं पडणार नाहींस. बरें, ज्या आजोबाचें ठाव ठिकाण तूं शोधावयास निघाला आहेस तो एकच तुझा पूर्वज होता काय ? तो जसा तुझा आजोबा, त्याप्रमाणें त्या आजोबाचाही आजोबा होताच व त्यालाही एक आजोबा असलाच पाहिजे. अशा रीतीनें ही सांखळी जर तूं जोडीत बसलास, तर त्यांपैकीं कोणत्या पूर्वजाचा अभिमान धरून तूं त्याचें ठिकाण शोधीत बसणार ? व जर सर्वांचाच शोध तुला करावयाचा असेल तरीही तुला पृथिवी-प्रदक्षिणा करावी लागणारच. तुह्मां कोंकणस्थांना कोंकणपट्टी कोणीं मक्त्यानें दिलेली नाहीं. एकटेंच काय, पण जगांतील कोणताही प्रदेश कोणीही सर्वस्वी आपलाच असें समजूं नये. कोणत्याही प्रांतामधील कोणाचीही वस्ती तेथें त्यास उदरनिर्वाह करण्याचें जें सामर्थ्य असेल त्यावर अवलंबून असतें. पूर्वी कोंकण तुमचें होतें, आतां तुमचें राहिलें नाहीं. तें दुसऱ्यांचें झालें, व आतां तुमचें घर निराळ्या मुलखांत आलें आहे. ह्याचप्रमाणें तुझ्या नातवाच्या नातवाचे वेळेस जर तुमची वस्ती, समज कनोज, प्रांतांत झालेली असेल तर तो बिचारा नातू तुझ्यासारखेच सुसकारे व फुणकारे टाकीत सोलापुरापर्यंत जमीन तुडवीत येईल. तात्पर्य काय ? कीं अशा रीतीनें जर ही धांवाधांव चालू राहील

तर कुणाचा कुणाला पत्ताच लागणार नाहीं. ह्मणून ह्मणतों कीं, तूं खरें कोंकण शोध. तूं असें कोंकण शोध कीं जें तुझ्या आजोबांनीं शोधलेलें होतें व जें तुझ्या नातवंडांनाही शोधावेंच लागेल. फार तर काय तूं असें कोंकण शोध कीं प्रत्येकाचा आजोबा जें शोधीत होता व प्रत्येकाचा नातू ज्याच्या शोधांत राहील. तुझ्या आजोबाचा आजोबा कोणत्या प्रदेशांतून कोंकणांत आला हें तुला माहीत आहे काय ? पण मीं तुला असें एक कोंकण शोधावयास सांगतों कीं जेथें सर्वांच्या आजोबांचें घर होतें. तुला एकट्यालाच कोंकण शोधण्याची गरज आहे असे नाही. अरे, जे खुद्द कोंकणांत आहेत त्यांनासुद्धां कोंकण शोधण्याची अवश्यकता आहे. रत्नागिरी मुलखांत राहिलें कीं कोंकण सांपडलें असें नाहीं. जें खरें कोंकण मीं तुला सांगितलें तें कोंकणांतही नाहीं व देशांतही नाहीं, तें पाश्चात्य मुलखांतहीं नाहीं व पौर्वात्य प्रदेशांतही नाहीं, तें समुद्रानेंही गम्य नाहीं व जमिनीनेंहीं सांपडण्याजोगें नाहीं. तुला वाटत असेल कीं आह्मीच एक कोंकणस्थ. नाकांत बोललें कीं आला कोंकणस्थपणा अशी तुझी समजूत. पण बाबा, कोंकणस्थपणा नाकांत बोलण्यावर मुळींच अवलंबून नाहीं. ज्यांना तूं देशस्थ समजतोस, ज्यांना कऱ्हाडे ह्मणतोस, ज्यांना शेणवी, प्रभु, कायस्थ, चिकित्सक, दैवज्ञ, नागर असें तूं मानतोस ते सर्व कोंकणस्थच आहेत व ते सर्व कोंकण सोधण्याकरितांच निघणार आहेत. उद्या उषेवर केवढी गर्दी होईल हें तुलाच समजून येईल. कारण हे सर्व लोक कोंकण शोधण्याकरितांच तेथें आलेले तुला दिसतील. तुला सांगितलें तर आश्चर्य वाटेल, पण मुसलमान, पारशी, यहूदी, चिनी हे सुद्धां कोंकणस्थच आहेत. लांब कशाला, खुद्द इंग्रज लोकसुद्धां कोंकणस्थच आहेत व त्यांचे भाईबंद जर्मन्, अमेरिकन, फ्रेंच, इटॅलियन् हेही कोंकणस्थच आहेत. अबबब ! इतके कोंकणस्थ ऐकून तुला आश्चर्य वाटेल, पण उद्यां उषेवर जेव्हां तूं गर्दींत मिळून जाशील तेव्हां माझ्या ह्मणण्याचा तुला प्रत्यवाय येईल. ह्या सर्वांचे वाडवडील कोंकणांत होते, परंतु तेथें जेव्हां त्यांना गरीबी आली तेव्हां कोंकण सोडून ते तेथून निघाले. आतां जेव्हां पुन्हां श्रीमंती येऊन ह्या सर्व लोकांना कोंकणांत जाण्याची ऐपत येईल तेव्हांच ते कोंकणांत प्रवेश करूं शकतील. ह्याकरितां माझा तुला असा उपदेश आहे तूं खऱ्या कोंकणांत जावयास नीघ. तूं ह्मणशील कीं, हे सर्व

लोक कोंकणस्थ कसे ? तर मला शद्वाकरितां मुळींच वाद घालावयाचा नाहीं. वाटेल तर ह्या सर्वांना तूं देशस्थच ह्मण. तुझी इच्छा असेल तर ह्या सर्वांना इंग्रज अथवा स्कँडिनेव्हिअन् असें नांव दे, पण हें पक्कें लक्ष्यांत ठेव कीं, जें ते असतील तेंच तूं आहेस व जें तूं आहेस तेंच तेही आहेत. तें खरें कोंकण किती सुंदर आहे ह्याची तुला कल्पना नाहीं. तुझ्या प्राकृत कोंकणपट्टींत कांहीं सुखें आहेत तर कांहीं उणिवा आहे. तेथें फणस आणि नारळ पिकत असतील, पण तेथें संत्रें व नारिंगें तुला मुळींच आढळावयाचीं नाहींत. तेथें तांदूळ व वऱ्या पिकत असतील, पण गहूं व बाजरींचें तेथें नांवही नाहीं. तेथें समुद्र व खाड्या असतील, पण सरित्प्रवाह व सरोवरें ह्यांचें तेथें दर्शनही व्हावयाचें नाहीं. अरे जेथें प्रत्यक्ष सृष्टि-देवीसुद्धां चार महिने मुळूमुळू रडत बसते तेथें भौतिक सौख्यांचा खडखडाट आहे हें निराळें का सांगावयास पाहिजे ! आतां हें कोंकण सोडून खऱ्या कोंकणाकडे पहा. त्या कोंकणांतून सर्वांचे आजेपणजे निघाले व त्या कोंकणाकडेच सर्वांना शेवटीं गेलें पाहिजे. हें कोंकण फारच रम्य, फारच दर्शनीय, फारच उत्कृष्ट आहे. मनुष्याच्या मनांत अशी एकही रमणीय कल्पना येत नसेल कीं जी त्या ठिकाणीं खरी होत नाहीं. मनुष्याचे हृदयांत अशी एकही उदात्त भावना येत नसेल कीं जिला त्या ठिकाणीं मूर्त स्वरूप येत नाहीं. ह्या सृष्टींमध्यें जें कांहीं सुंदर, जें चेतोहर, जें चटका लावणारें, जें जें ह्मणून मन खुलविणारें आहे तें तें सर्व तेथें आहे व ह्याशिवाय तेथें असे अनेक आनंद भरलेले आहेत कीं मनुष्यानें आपली कल्पनाशक्ति कितीही दीर्घ केली तथापि तिच्या आटोक्यांत ते मुळींच येणार नाहींत. प्रक्षुब्ध झालेलीं अंतःकरणें तेथें शांत होतात, तळमळणारीं चित्तें तेथें समा-धान पावतात, पीडित जीव तेथें विश्राम घेतात. असलें हें आपल्या उच्चतेनें विराजमान होणारें अवर्णनीय कोंकण सोडून गांवठी कोंकणाचा इतका निदिध्यास तूं काय ह्मणून धरतोस ? आपल्या मानवी जीवित्वाचें जर सार्थक करून घ्यावयाचें असेल तर त्या सर्वोन्नत प्रदेशाची हांव धर. ईश्वरानें तुला दिलेलें आयुष्य फारच ज्यास्त आहे अशी तुझी कल्पना आहे कीं काय ? ईश्वरानें मानवांस १०० वर्षें आयुष्य नेमण्यांत अनाठायीं औदार्य दाखविलें असें तुला वाटतें काय ? तसें नसेल तर ऊठ व आयुष्याचा एक क्षणही व्यर्थ जाऊं देऊं नकोस. तुझी काय आणि तुमचे

आजोबा काय, सर्वच अपूर्ण. अपूर्णांनीं अपूर्णांचें मोठें कौतुक जरी केलें तरी त्यापासून पूर्णता कधींच निष्पन्न व्हावयाची नाहीं. तुला पूर्णता हवी असेल तर पूर्णतेचे उद्योग कर. जो प्रदेश मीं तुला सांगितला तो पूर्णतेचा प्रदेश आहे. तेथें अपूर्ण असें कांहीं नाहीं. तेथील मनुष्यें हवेंत उडणारीं आहेत व तेथील पक्ष्यांना मानवांप्रमाणें वाणी आहे. तेथील जल अमृतमय आहे व तेथील अमृत नदीप्रवाहानें वाहणारें आहे. तेथील अन्नांत समाधान हा एकच गुण आहे व तेथील पेयांत केवल माधुर्यच भरलेलें आहे. तेथें एकच ऋतु वसंत हा आहे व तेथें एकच अवस्था तारुण्यावस्था ही आहे. तेथें परिमल हा एकच गंध आहे व तेथें चारुता हें एकच रूप आहे. तेथील स्त्रिया कोमलतेच्याच बनविलेल्या आहेत व पुरुष मूर्तिमंत उत्साहच आहेत. सत्य हा एकच गुण तेथें आहे व तेथें ज्ञान ही एकच संपत्ति आहे. परोपकार ही एकच स्पर्धा तेथें आहे व प्रेम हा एकच विकार तेथें नांदतो. तेथील चन्द्रावर डाग नाहींत व तेथलि गुलाबांवर कांटे नाहींत. तेथील नाग निर्विष आहे व तेथील व्याघ्र अहिंसक आहेत. तेथील धेनूंवर पुष्ट होण्याचीच कायती जबाबदारी आहे व तेथील गजांना झुलण्याचेंच तेवढें काम आहे. सुविचार हा एकच व्यवसाय तेथें आहे व कविता ही तेथें एकच विश्रांति आहे. तेथें प्रज्ञा ही एकच दृष्टि आहे व दिव्यगीत हें एकच श्रवण आहे. तेथें परहित ही एकच लालसा आहे व परसाहाय्य ही एकच चिंता आहे. मानवी शास्त्रांनीं पूर्वी लावलेले सर्व भौतिक शोध तेथें दृश्यमान आहेत व भौतिक शास्त्रांच्या सर्व भावी शोधांचे नकाशे तेथें उलगडून ठेवलेले आहे. तेथें आयुष्याचे हांडे भरून ठेवलेले आहेत व सुदैवाचे तेथें खजिनेच आहेत. तेथें सर्व भाषा चालतात व सर्व वाङ्मयांची तेथें अभिवृद्धि होते. तेथें पंक्तिप्रपंच बिलकूल नाहीं व तेथील हवेंत भेदबुद्धि तर गुदमरूनच जाते. तेथें सर्वत्र समता आहे, सर्वत्र एकरूपता आहे, सर्वत्र पूर्णता आहे. न्यायबुद्धि हाच तेथील स्वभाव आहे व कृपालुत्व हेंच तेथील व्यसन आहे. तेथील मयूरांचा सुस्वर कंठ आहे व तेथील कोकिलांचा सोनेरी वर्ण आहे. तेथील पोपट न शिकवितां बोलतात व तेथील भृंग न डसतां गुंजारव करितात. तेथें सुवर्ण हा एकच धातु आहे व हिरा हा एकच पाषण आहे. तेथें मन हा एकच जासूद आहे व विवेक हा एकच नोकर आहे. सर्व रंग तेथें भरलेले आहेत, सर्व

फलें तेथें पक्वतेस येतात, सर्व सौख्यांचीं तेथें भांडारें आहेत व सर्व आनंद तेथें गजबजून राहिलेले आहेत. अहाहा! असा सुंदर प्रदेश कोणास मोहित करणार नाहीं! अशी भूमि कोणास मोहिनी घालणार नाहीं? मनोहर, ह्या अलौकिक लोकाचें आतांपर्यंत मीं जें वर्णन केलें त्यावरून त्याच्या श्रेष्ठपणाची थोडी-बहुत कल्पना तुला झालीच असेल. विचारी पुरुषानें जर एखादा प्रदेश पहाण्याची हांव बाळगावयाची असेल तर ती असलाच प्रदेश पहाण्याची होय. हा प्रदेश पाहण्याची अनावर इच्छा हेंच कोणत्याही महत्त्वाकांक्षेचें चीज व कोणाच्याही आयुष्याचें सार्थक होय. परंतु मीं केलेलें वर्णन हें त्या अत्युन्नत प्रदेशाचें यथायोग्य वर्णन आहे असें तूं समजूं नकोस. माझें वर्णन ही त्याच्या वास्तविक शोभेची अगदींच पुसट अशी छटा आहे, किंबहुना तो प्रदेश तूं स्वतः पाहिल्यावर माझें वर्णन हें त्या प्रदेशाच्या खऱ्या सौंदर्याचें मुळीं वर्णनच नव्हे असें तुला वाटेल. परंतु काय करावें? तुह्मां मानवांना त्याचें वर्णन द्यावयाचें ह्मणजे तें तुमच्या मानवी भाषेंत, मानवी कल्पनेंत व मानवी चित्रांतच द्यावें लागतें. इतर रीतीनें केलेलें वर्णन कितीही यथार्थ असलें तरी त्यामुळें त्या प्रदेशाच्या चांगुलपणाची तुह्मांला मुळींच कल्पना यावयाची नाहीं. एखाद्या चतुष्पाद प्राण्यास अमृताची कल्पना करून द्यावयाची ह्मणजे तुह्मी मानवच त्यास कसें सांगाल बरें? तुह्मी त्यापुढें असें ह्मणाल काय कीं अमृत हें दुधापेक्षां, मधापेक्षां, शर्करेपेक्षां अथवा आम्ररसापेक्षांही ज्यास्त मधुर असतें? तुह्मी त्यास असें सांगाल काय कीं अमृत ह्मणजे जिलेबीपेक्षां अथवा बरफी-पेक्षांही गोड आहे? असें तुह्मीं सांगितल्यानें अमृताविषयीं त्यास काय कल्पना येईल? त्यास अमृत ह्मणजे एक उत्तम पदार्थ आहे असें वाटणार सुद्धां नाहीं. त्याला अमृ-ताची कल्पना करून द्यावयाची ह्मणजे असेंच सांगितलें पाहिजे कीं अमृत हें हिर-व्यागार गवतापेक्षां, भुइमुगाच्या ओल्या डाहळ्यापेक्षां, अथवा तिळाच्या ताज्या पेंडेपेक्षांही फार रुचकर असतें. जसा श्रोता तशी भाषा बोलावी लागते. तुह्मां मानवांपुढें तुमच्या भाषेंत बोलणें भाग पडत असल्यामुळें कित्येक तत्त्वज्ञानें हीणकस झालेलीं आहेत. परंतु तो तुह्मां मानवांच्या अल्पशक्तीचा दोष होय, त्या तत्त्वज्ञानांच्या असमर्थतेचा दोष नव्हे. मीं तुला असें सांगितलें कीं त्या उत्तम प्रदेशांत रम्य सरोवरें व रमणीय पक्षी असतात, परंतु हें जितकें खरें आहे तितकें तें एक प्रकारें कल्पनास्थितही आहे. परंतु तूं असें समज कीं मानवांच्या कल्पनांचा जोर जेथपर्यंत

चालूं शकेल, गंधर्व-किन्नरांच्या कल्पनेची गति जेथपर्यंत जाऊं शकेल, अथवा देवांच्या कल्पनाप्रसारालाही जेथपर्यंत वाव मिळेल त्यापेक्षांही ज्यास्त सुंदर, ज्यास्त विलोभनीय व ज्यास्त हृदयंगम असा तो प्रवेश आहे. ह्याचें यथार्थ वर्णन करितां येईना ह्मणूनच मी तुह्मां मानवांना पटेल अशी मानवी वाणी तुझ्याबरोबर अंगीकारली, त्याचें वर्णन करितां करितां थकल्यामुळेंच कोणीं **स्वर्गाचें** मनोमोहक चित्र रेखाटलें, कोणीं त्यास **मुक्ति** अथवा **मोक्ष** असें नांव दिलें व कोणीं कोणीं तर त्यास **निर्वाण** एवढें ह्मणूनच स्वस्थ बसले. जें मूळचेंच अवर्णनीय त्याचें वर्णन तरी कोण करणार ?

तूं ह्मणतोस कीं, मी आपल्या आजोबांच्या कोंकणांत जाईन. ठीक आहे, जा, पण खरोखर जें तुझ्या आजोबांचें कोंकण असेल तेथेंच जा. तूं ह्मणतोस तें तुझें खरें कोंकणही नव्हे व ते तुझे खरे आजोबाही नव्हेत. तुझे खरे आजोबा तेच होत कीं जे मीं सांगितलेल्या त्या अत्यंत पुण्यधाम कोंकणांत राहतात. तें स्थान ते कधींही सोडून जात नाहींत व त्या तुझ्या आजोबांना कधीं दारिद्र्यही पण आलें नाहीं. सर्व श्रीमंतीचें अधिष्ठान असे जे आजोबा ते दरिद्री होतील असें कधीं संभवतें काय ? ते तुझे, तसेंच ह्या विश्वांतील सर्वांचेही, आजोबा आहेत व त्यांचा चित्कलांश अणुरेणूंपासून तों परम तेजस्वी अशा तपस्विजनांपर्यंत सर्वांचे ठिकाणीं भरून राहिलेला आहे. ते सर्वांचे आजोबा आहेत ह्मणून त्यांस **पुराणपुरुष** असें ह्मणतात. ह्या पुराण पुरुषापासूनच सर्व विश्वाची उत्पत्ति झाली व ह्या पुराणपुरुषामध्येंच सर्व विश्वाचें निमीलन होणार आहे. हा पुराणपुरुष इतका प्राचीन आहे कीं, सर्वांच्या आयुष्यांचें मोजमाप करणारा जो काल त्या कालाचेंही आयुष्य त्यानें मोजलेलें आहे. अनाद्यनंत असें समजलें जाणारें जें आकाश त्याचा आरंभ त्यानें पाहिलेला आहे. हें विशाल विश्व जेव्हां मुळींच नव्हतें तेव्हांही तो होता व पाण्यामध्यें द्रवत्व येण्यापूर्वी त्याचें अस्तित्व होतें. पितामह ह्मणून गाजणारा जो ब्रह्मदेव त्याचा जन्म ह्याच्यासमक्षच झाला व पृथ्वीवर हिमालयाचें ओझें कधीं ठेवलें हेंही त्यानें प्रत्यक्ष अवलोकन केलें. गयेंतील प्रचंड वटवृक्षाचें बीज जेव्हां रोंवलें गेलें तेव्हां तो होता व सिन्धुनदीनें पंजाबांतून वाहण्याचा निश्चय ह्यास विचारूनच केला. गंगायमुनांची भेट ह्याच्या समक्षच झाली व प्राचीन आर्य-

लोक आपलीं मुलेंबाळें घेऊन ह्याच्या देखतच बर्फाच्छादित प्रदेशांतून हिंदुस्थानांत उतरले. होमरनें आपलें काव्य ह्यास साक्षी ठेवूनच लिहिलें व वाल्मीकीस काव्य-स्फूर्ति देणारा क्रौंचपक्षी ह्याचे समक्षच मारला गेला. ईजिप्तमधील मनोरे बांधतांना ह्याचेच आशीर्वाद घेतले होते व चीनचा अगडबंब तट बांधतांना ह्याचेंच आशीर्व-चन कामीं पडलें. रामाची सीता रावणाचे अशोकवनांत असतांना हा होता व हनु-मंतानें द्रोणागिरी आणला तेव्हां ह्यानेंच त्याची तारीफ केली. रामायण अगोदर लिहिलें कीं महाभारताची रचना अगोदर झाली हें ह्यास माहीत आहे व उत्तरकांड प्रक्षिप्त कीं कसें ह्याचा निकालही ह्यास खरें विचारलें तरच लागेल. भगवद्गीता रणांगणावर समग्र सांगितली कीं बीजरूपानें सांगितली ह्याची माहिती ह्यास आहे व भगवद्गीतेंत मूळ श्लोक किती हेंही ह्यासच विचारलें पाहिजे. गुरु—बुध आदि ग्रह ह्यांनीं ह्याच्या अनुमतीनेंच सूर्याभोंवती गाऱ्याभिंगाऱ्या करण्यास सुरवात केली व ह्याच्या अनुज्ञेनेंच शनीनें आपलें शरीर वलयांकित केलें. हा पहात असतांनाच अग्नि सागराचे उदरांत दडून बसला व ह्याचे दृष्टीसमोरच उदकानें अंतरिक्षांत उड्डान करून मेघरूप धारण केलें. ह्याचें रूप दृष्टीस पडावें ह्मणूनच तारका आपली लुकलुक-णारी दृष्टि विकसित करूं लागल्या व ह्याचें लक्ष्य वेधण्याकरितांच विद्युल्लता नभोमं-डळांत तळपूं लागली. असें काय आहे कीं जें ह्यास विदित नाहीं? असें काय आहे कीं ज्याची उत्पत्ति ह्यानें जाणली नाहीं ? अशी कोणती वस्तु आहे कीं जिचा आरंभ ह्याचे समक्ष झाला नाहीं ? असला हा अनंत विश्वाचा जनिता पुराणपुरुष आपल्या-पासून निर्माण झालेल्या चराचराचें अवलोकन करीत आपल्या दिव्य प्रदेशांत विराज-मान झालेला असतां, असा कोण अभागी आहे कीं जो त्याचें व त्याच्या दिव्य स्थानाचें दर्शन घडो ह्मणून तळमळणार नाहीं ?

संपलें. माझ्या कानावर अत्यंत तीव्रतेनें आघात करणारें व क्षणोक्षणीं अंत-रंगाची खळबळ उडवून देणारें तें अमोलिक वाक्पटुत्व स्तब्ध झालें व माझ्या हृदयाचा आवेग मला अनावर होऊन वर्षाकालीं पर्वताच्या कुहरांतून जसा वेगाचा जलप्रवाह सुरू होतो तसा संतत अश्रुप्रवाह माझ्या नेत्रांतून सुरू झाला. माझें सर्व शरीर जड झालें, हातपाय हालविण्याचीही माझे अंगांत शक्ति उरली नाहीं. माझ्या स्वतःवर माझा ताबा अगदीं नाहींसा झाला व मी अगदीं पराधीन झालों.

तो तेजःपुंज देह माझ्यापुढें उभाच होता. अश्रूंचा सर्व उमाळा थांबल्याखेरीज त्याच्याकडे नुसतें बघणेंसुद्धां मला शक्य नव्हतें. एखादा मोठा भयंकर धक्का बसून सर्व शरीरांत जसें ' सुन्न ' होतें तसें मला होत होतें. निद्रेनें बाहेरील जगापासून मला निराळें केल्यापासून तों त्या दिव्य महात्म्याचें भाषण संपेपर्यंत किती वेळ झाला हें मला मुळींच कळलें नाहीं. त्या रात्रींचे विभाग मला करितां आले नसते. ती एखादी अत्यंत दीर्घ निशा होती कीं, तो फारच अल्प कालावधि होता हें मला मुळींच कळलें नाहीं. मला आठवतें तें इतकेंच कीं ते अलौकिक शब्द कानीं पडल्यानंतर माझी स्वतःविषयीं स्मृतिच नष्ट झाली व त्या निश्चेष्ट स्थितींत मी जो पडलों तों दुसरे दिवशीं प्रातःकालीं जागा झालों. जागा होतांच माझ्या पलंगाजवळ कोणीतरी उभें आहे असें मला वाटलें. " हा येथें उभा कोण ? " असें वाक्य वायूच्या झटक्याप्रमाणें जोराजोरानें उच्चारीत मी खडबडून उठलों. माझे डोळे तारवटलेले होते व चेहेरा निस्तेज झालेला होता. माझी अवस्था शेट डाह्याभाईंच्या लक्ष्यांत आली. कारण माझ्या बिछान्याजवळ तेच उभे होते. 'मनोहरजी, तुह्मांला झोंप नाहीं का लागली ?' असें त्यांनीं प्रेमळ पण साचिंत स्वरांत विचारलें. मी भानावर आलों, माझ्याजवळ दुसरें कोणी नाहीं अशी खात्री करून घेतली व नंतर त्यांस पश्चात्तापपूर्वक ह्मटलें, " शेटजी, आतां झोंप कशाची ? इतके दिवस निजण्यांत घालविले हे पुरे नाहीं का झाले ? आतां जागेंच झालें पाहिजे. पहा, हें घर, ह्या खिडक्या, हा पलंगसुद्धां मला आतां असें सांगत आहे कीं निदान ह्यापुढें तरी जागा हो. "

पूर्व संबंध माहीत असल्यावांचून शेटजींना माझ्या बोलण्याचा अर्थ काय लागणार ? त्यांनीं तो विषय तितकाच टाकला व आपल्या नोकरास हांक मारून ह्मटलें, " जगजीवन, तुझ्या आहेना लक्ष्यांत आज पाहुण्यांना बोटीवर जावयाचें आहे तें ? "

जगजीवन 'होय' ह्मणून माझ्या तयारीला लागला. मीही इतका आल्यासारखा प्रवासाला निघालोंच, पण मनांत निश्चय केला कीं, ज्या दिव्य प्रदेशाची हकीकत त्या कृपाळू महात्म्यानें मला सांगितली त्याचा शोध लागल्यावांचून इहलोकच्या जीवितांत आनंद मानणार नाहीं.

# सामर्थ्यवान् मंत्रवाणींत



ग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजं । होतारं रत्नधातमं ॥ १ ॥ आग्निः पूर्वेभिर्ऋषिभिरीड्यो नूतनैरुत । स देवाँ एह वक्षति ॥ २ ॥ अग्निना रयिमश्नवत् पोषमेव दिवेदिवे । यशसं वीरवत्तमं ॥ ३ ॥ अग्ने यं यज्ञमध्वरं विश्वतः परि-भूरसि । स इद्देवेषु गच्छति ॥ ४ ॥ अग्निर्होता कविक्रतुः सत्यश्चित्रश्रव-स्तमः । देवो देवेभिरागमत् ॥ ५ ॥ यदंग दाशुषे त्वं अग्ने भद्रं करिष्यसि । तवेत्तत्सत्यमंगिरः ॥ ६ ॥ उप त्वाग्ने दिवेदिवे दोषावस्तर्धिया वयं । नमो भरन्त एमसि ॥ ७ ॥ राजन्तमध्वराणां गोपामृतस्य दीदिवं । वर्धमानं स्वे दमे ॥ ८ ॥ स नः पितेव सूनवेऽग्ने सूपायनो भव । सचस्वा नः स्वस्तये ॥ ९ ॥

# आधुनिक मराठी भाषेंत

अग्नि हा यज्ञाचा अग्रणी आहे. यज्ञाचा प्रमुख देव तोच. यज्ञाचे हवि-र्भाग त्या त्या देवतांप्रत पोंचविणारा सन्माननीय आचार्यही पण तोच. असंख्य रत्नांचा अनुपम निधि ह्याचे जवळ आहे. तेव्हां अशा अग्निदेवाचें मी स्तवन करितों ॥ १ ॥ पूर्वकालीन ऋषींना या अग्नीची स्तुती करण्यांत प्रेम वाटलें व अर्वाचीन ऋषींनाही तो स्तवनाला सर्वथैव योग्य वाटतो. आमच्या यज्ञांत हाच अखिल देवांना घेऊन येतो ॥ २ ॥ या अग्नीमुळेंच भक्ताला वैभव प्राप्त होतें आणि तें वैभवही असें कीं जें दिवसानुदिवस वृद्धिंगत होत जातें. वीरश्रेष्ठ पुरुषांना-

च जी जयश्री माळ घालणार तीही या अग्नीच्या कृपेनें पूजकास प्राप्त होते ॥ ३ ॥ हे अग्निदेवा, ज्या पवित्र यज्ञावर चोहोंकडून तुझी दृष्टि असते. तोच यज्ञ देवांना ग्रहण करण्यास योग्य वाटतो ॥ ४ ॥ अग्निद्वारेंच सर्व देवांना त्यांचे हविर्भाग प्राप्त होतात. बुद्धिशाली पंडितांना ह्याचेपासून ज्ञानसमर्थ्य प्राप्त होतें. ह्यानें दिलेले वर निःसंशय सफल व्हावयाचेच व कोणी भक्त कितीही ठिकाणीं ह्यास पाचारण करोत त्यांची प्रार्थना ह्याचे कानावर गेली नाहीं असें कधीं व्हावयाचेंच नाहीं. असा हा अग्नि देवसमुदायासह येथें प्राप्त झाला आहे ॥ ५ ॥ हे अग्निदेवा, हे अंगिरसा, उपासकांना जें कांहीं मंगल आशीर्वचन तूं देशील तें सत्य झालेंच पाहिजे याबद्दल शंका नाहीं. ॥ ६ ॥ हे अग्ने, प्रत्यहीं, रात्रीं व दिवसा, अन्तःकरणपूर्वक तुला वंदन करीत आह्मी तुझ्या चरणाचा आश्रय करितों ॥ ७ ॥ कारण प्रत्येक पुण्य-यज्ञांत तूंच विराजमान होतोस, सर्व विधींचा रक्षणकर्ता तूंच आहेस, तुझें तेज अत्यंत देदीप्यमान आहे, यज्ञांत स्थित असतां तुझ्या आनंदाला भरती येते ॥ ८ ॥ हे अग्निदेवा, आह्मी तुझीं लेकरें आहोंत. मायाळू पित्याप्रमाणें आमचे लाड तूं उत्तम तऱ्हेनें पुरव. आमच्यापासून दूर जाऊं नको. त्यांतच आमचें क्षेम आहे ॥९॥

# तालासुरावर

**चाल— [ सिंहासनिं बैसेल इ. ]**

अग्निरूपधर हे परमेशा देवा अध्वरपते
वंदितों प्रेमें तव चरण ते ॥ धृ० ॥
यागामध्यें विराजसी तूं ऋत्विज अमुचा खरा
अर्पुनी हवि नियमानें सुरां ।
अमितरत्ननिधिधारक तुजला स्तविलें मुनिंहीं पुरा
स्तवितसे नव कविचांही गिरा ।
चाल हा पहा आणितो सकल देव ह्या स्थलीं

ह्यायोगें भावुकगृहीं ऋद्धि धांवली
जी प्रत्यहिं ह्याच्या कृपें वृद्धि पावली
प्राप्त होय जी कीर्ति रणांगाणीं विक्रमशाली नरां
ती बरी प्रेमें तार्किकरा ॥ १ ॥
सर्वोपरि ज्या पवित्र यज्ञावरी दृष्टि तव असे
सुरांना मान्य तोचि होतसे
हाचि हव्यवह, मतिमंतांना सुमति हाचि देतसे,
सत्यता आशिषिं ह्याच्या वसे.
चाल ह्या अनेक ठायीं जरी भक्त बाहती
तरि सकल आर्तरव वेधिति ह्याची श्रुति
हा पहा पातला सकलदेवसंगतीं
हे अग्निप्रभु, हे आंगिरसा, इच्छिसि तूं बा जसें
लाभतें मंगल भक्तां तसें ॥ २ ॥
प्रतिदिनिं रात्रीं प्रतिदिनिं दिवसां नमुनि भक्तिनें तुला
शोधितों आश्रय तव वत्तला
यज्ञामध्यें शोभसि, देवा, सत्यविधींना भला
तुझा दृढ आधारहि लाभला
कितितरी समुज्ज्वल असे तुझी ही प्रभा
तूं स्वयज्ञसदनीं जेव्हां ठाकसि उभा
तव हर्षनिर्भरें ज्वाला ग्रासिति नभा
करीं कृपा, दे जेंवि भातुकें जनक लाडक्या मुला
जवाळिं घे दूर करीं भीतिला ॥ ३ ॥

# अमृताचा घुटका.



मृताचा घुटका आपल्या नशीबीं कोठला ? अमृताचें आस्वादन आपणास कोठून होणार ? जोंपर्यंत मृत्युलोकाचे दरवाजे फोडून आपण बाहेर निघालों नाहीं तोंपर्यंत बाहेरची विशुद्ध हवा, बाहेरचें सुखस्वातंत्र्य, बाहेरची मृत्युस्वाधीनता आपल्या नशीबीं कोठची ? ह्या मृत्युलोकांत जोंपर्यंत आपण आहों तोंपर्यंत आपण कितीही उच्चत्वास पोंचलों तरी अमृत आपणांपासून दूरच राहणार. आपण श्रीमंत झालों तरी आपण काय मिळवूं ? गरीबाच्या स्वप्नांतसुद्धां कधीं यावयाचे नाहींत असे उंचीउंची पोषाख आपण अंगावर घालूं, ज्याच्या शिखराकडे दृष्टि पुरवतां पुरवतां गरीबाच्या डोक्यावरचें मळकें ‘ मुंडासें ’ फिरून धुळींत पडून मळेल इतकीं उंच निवासमंदिरें आपण बांधूं, आपलें प्रत्येक काम करण्याकरितां इतके नोकर आपण ठेवूं कीं, त्यांची वस्ती एका शहराला पुरेल व ज्यांच्यापुढें सुवर्णाच्या ढिगालाही एखाद्या हीणकस धातूप्रमाणें तुच्छ मानावें लागेल अशा बहुमोल हिऱ्यांचा खजिना आपल्या संग्रहीं असेल, पण अमृताला स्पर्श करण्याचीमात्र, जोंपर्यंत आपण ह्या मानवदेहाच्या पिंजऱ्यांत कोंडलेलों आहों तोंपर्यंत, आपली ‘ मात्रा ’ चालणार नाहीं. मानवी शक्तीची मर्यादा ठरलेली आहे. मानवी शक्तीचा अत्यंत अभाव

व मानवी शक्तीचा अत्यंत विकास ह्यामध्यें हवें तितकें अंतर असूं शकेल, पण मानवी शक्ति ही शक्तीची परमावधिमात्र खचित नव्हे. अमृताला तोंड लावण्याचा ज्या शक्तीच्या अंगीं ' यावज्जन्म ' पराक्रम यावयाचा नाहीं ती शक्ती परिमित आहे असें कबूल करण्यांत अपमान कोणता ?

'तूं मानव आहेस' असें मनुष्यप्राण्यास सदोदित हिणवणाऱ्या ज्या कांहीं वस्तु जगांत आहेत त्यांपैकीं अमृतही एक आहे अमृत हें नेहमीं मनुष्याच्या आटोक्याचे बाहेर उभें रहात असतें व तेथून ' तूं किती दुबळा ? ' तूं किती दुबळा ? अशा मनुष्यांना वांकोल्या दाखवीत असतें. गर्विष्ठ मनुष्य चरफडतो, स्वतःशीं टांचा घांसतो, अमृतास आपल्या पकडींत धरण्याकरितां हात पुढें करतो, पण सरकारी प्राणिसंग्रहांतल्या चित्त्याचा मनस्ताप जसा फुकट जातो त्याप्रमाणें ह्याचेंही खिजणें अगदीं व्यर्थ होतें. त्याचे दृष्टीपुढील तें अमृत त्याची तशीच थट्टा करीत उभें असतें, पण मनुष्यास त्याच्यावर ताबा मिळविण्याचा कोणताही मार्ग सांपडत नाहीं.

तथापि मानवी कुडींत असतांनासुद्धां अमृताचा घुटका घेणें अगदींच अशक्य आहे असें नाहीं, पण हा घुटका घ्यावयाचा असेल तर मनुष्यानें आपलें मनुष्यत्व टाकलें पाहिजे. दुरभिमान हा मनुष्यत्वाचा एक मोठा विशेष आहे, परंतु हा जोंपर्यंत मनुष्य स्वभावांत जागृत आहे तोंपर्यंत मनुष्यास अमृताचा अनुभव कधींही मिळावयाचा नाहीं. अमृताचा अनुभव घेण्यास मनुष्यानें निरभानी झालें पाहिजे. हा निरभानी होण्याचा आयुष्यांतील क्षण फार महत्त्वाचा

असतो व मनुष्यास आपल्या आयुष्याचा जर केव्हां अभिमान बाळगण्याचा प्रसंग येत असेल तर तो ह्याच क्षणाचा होय. ह्या क्षणांत मनुष्य अमृताचा घुटका घेत असतो ह्मणून हा क्षण त्यास निरुपम आनंदाचाही असतो. मनुष्यत्व व देवत्व ह्यांचा त्या वेळीं उन्नतिप्रद संगम होत असतो. मनुष्यत्वाच्या अनेक हीन लहरी ह्या वेळीं देवत्वांत मिसळून गेलेल्या असतात व देवत्वाच्या अनेक दिव्य लहरी मनुष्यास उच्चत्वाप्रत नेण्याकरितां त्याच्याकडे प्रेमानें आलेल्या असतात. ह्यावेळीं मनुष्य स्वर्गावर आरूढ झालेला असतो व स्वर्ग पृथिवीवर अधिष्ठित होतो. त्या वेळच्या शोभेचें वर्णन कोणासही करितां येईल काय ?

मनुष्य ज्या वेळीं अमृताचा घुटका घेत असतो त्या वेळच्या त्याच्या कृतीस **प्रार्थना, पूजा, उपासना,** इत्यादि नांवें मिळालेलीं आहेत. खरोखर प्रार्थना ह्मणजे मनुष्यानें देवत्वाशीं स्वतःची गांठ घालणें होय. मनुष्याच्या हांतून त्याच्या आयुष्यांत ज्या नाना प्रकारच्या कृति घडून येतात त्या सर्वांमध्यें **प्रार्थने**इतकी उत्कृष्ट व उदात्त कृति दुसरी कोणतीही नसेल. वास्तविक पाहतां प्रार्थनेंत मनुष्य वांकत असतो, परंतु त्याच्या प्रत्येक वांकण्याबरोबर उन्नति त्यास वर चढवीत असते. प्रार्थना करीत असतां मनुष्याचें मुख जमिनीला लागत असतें, परंतु त्याच भूमीचा मुखस्पर्श त्याचे जिव्हाग्रावर अमृतबिंदु ओतीत असतो. प्रार्थना चालली असतां मनुष्याच्या नेत्रांतून अश्रु स्रवत असतात, परंतु ह्याच अश्रुबिंदूंच्या सिंचनानें त्याच्या

अध्यात्मिक जीवनाचें रोप वाढीला लागत असतें. प्रार्थना करीत असतां मनुष्यास पुलकोद्भव होतो, परंतु हेच रोमांच त्याच्या प्रार्थना-विषय जगत्प्रभूचें अंतःकरण गद्गदित करीत असतें. मनुष्याच्या कोणत्याही कृतींत खरा अर्थ असेल तर तो त्याच्या **प्रार्थनेंतच** आहे आणि ह्मणूनच प्रार्थना ही त्यास फार शोभा देते.

मनुष्य प्रार्थनेनें फारच शोभतो. त्याची दुसरी कोणतीही कृति त्यास इतकी भूषणप्रद होत नाहीं. कित्येक लोकांना असें वाटतें कीं आपले विद्वान झालों ह्मणजे सुंदर दिसूं, कित्येक श्रीमंतीच्या मोह्याला बळी पडतात, कित्येक पराक्रमाच्या मागें लागतात, कित्येक मोठमोठ्या उद्योगांना सुरवात करून सुंदर दिसण्याची हांव धरतात. कित्येकांना दुःखें सहन करून सौंदर्य मिरविण्याची इच्छा असते. कित्येक स्वजनसेवेनेंच स्वतःस सौंदर्य आणतात आणि कित्येकांस सत्तेंत सौंदर्य आहे असें वाटत असतें. त्यांपैकीं कोणती गोष्ट सुंदर नाहीं ? प्रत्येक सुंदर आहे. नुसत्या शरीरसौंदर्यापेक्षां प्रत्येकींत शतपट सौंदर्य आहे. परंतु हें सौंदर्य ज्याच्या पासंगासही पुरणार नाहीं अशी एक दुसरी गोष्ट आहे आणि ती प्रार्थना हीच होय. जूलियस सीझरला लाज वाटेल इतके पराक्रम मनुष्य करो, बृहस्पती चकित होईल इतकी विद्वत्ता त्याचे अंगीं असो, शिकंदरला हेवा वाटेल इतकी सत्ता त्यास प्राप्त होवो, विश्वकर्म्याला सुचणार नाहीं एवढ्या यांत्रिक कल्पना तो आस्तित्वांत आणो अथवा केवळ शरीर

सौंदर्यच हिशेबांत धरावयाचें असेल तर त्याच्या फोटोकडे पाहून प्रत्यक्ष मदनही स्वतःच्या रूपांतील उणीवा कृत्रिम रंगशलाकांनीं भरून काढो, परंतु तो खरा सुंदर आहे कीं नाहीं हें जर आपणांस पहावयाचें असेल तर आपल्या आयुष्यांतील थोडातरी भाग तो **प्रार्थनेंत खर्च करतो कीं नाहीं** ह्याची चौकशी केली पाहिजे. कारण प्रार्थनेशिवाय मानवास खरें सौंदर्य कधींही प्राप्त होत नाहीं.

प्रार्थना मनुष्याचें मनुष्यत्व त्याच्या निदर्शनास आणून देते व अमृतत्वाचा रस्ता त्यास मोकळा करते. इतर व्यवहार, मग ते कितीही उत्तम असोत, मनुष्याचा दुरभिमान बळावतात व त्यास मनुष्यत्वापुढें पाऊलच टाकून देत नाहींत. ह्मणून मनुष्य इतर दृष्टीनें कितीही चांगला असला तरी त्यानें एकतरी निवांत क्षण साधून त्या वेळीं **प्रार्थना** केली पाहिजे. प्रार्थना हा सर्व सत्कृत्यांचा **रोजखर्डा** आहे व ज्याप्रमाणें एखाद्या व्यापाऱ्याचे दुकानांत रोज लक्षावधि रुपयांची घडामोड होत असली तरी त्याचा **रोजखर्डा** दुरुस्त नसल्यास व्यापारांत पुढें पाऊल टाकणें त्यास कधींही शक्य होणार नाहीं त्याचप्रमाणें मनुष्य कितीही उच्च स्थितींत असला तरी जोंपर्यंत तो आपल्या आयुष्यांत प्रार्थनेकरितां एकही निमिष राखून ठेवीत नाहीं तोंपर्यंत ह्या जगापलीकडील रस्ता त्यास दिसणार नाहीं. व्यवहार मग ते ज्ञानाचे असोत, पराक्रमाचे असोत अथवा साहसाचे असोत, ते जितके जितके ज्यास्त करीत जावें तितका तितका त्यांचा ज्यास्त विळखा बसत

जातो. ते व्यवहार कितीं जरी चांगले अथवा अवश्यक असले तरी ते बंधनभूत झाल्यावर त्यांतली मजा नाहींशी होते. चांगल्या गोष्टी मनुष्यास हव्या खऱ्या, पण त्या त्याच्या उपभोगाकरितां हव्या, त्यांचेपासून त्यांस कांच बसावा अशासाठीं त्या नकोत. परंतु मूळ उपभोगाकरितां ह्मणून बोलावलेल्या गोष्टी कांहीं केल्या तरी मनुष्यालाच आपल्या कबजांत ओढण्याचा प्रयत्न करितात. यासाठीं त्यांचा वेग वेळोवेळीं थांबवून धरून मनुष्यानें एक क्षण तरी विश्राम घ्यावा लागतो. ह्या विश्रामास उत्तम अवसर **प्रार्थने**शिवाय दुसरा कोणता ?

प्रार्थना करणें ह्याचाच अर्थ मुळीं मनुष्यानें ऐहिक व्याप धिसरून ह्या ऐहिकापलीकडील ज्या दुसऱ्या गोष्टी आहेत त्यांचेकडे आपलें लक्ष्य लावणें असा होय. इतर कोणताही व्यवहार घेतला तरी तो ऐहिकाचाच भाग असतो. एवढेंच कशाला? अध्यात्मगोष्टींमध्यें निष्णातपणा मिळवून आपणास आचार्य, पंडित अथवा तत्त्वज्ञानी ह्मणवून घेणें ह्यासही व्यवहाराचेंच रूप येतें. लोकांचीं संसारबंधनें कमी त्रासदायक कशीं होतील ह्यांविषयीं युक्त्या सुचविण्याचा अथवा हूडकून काढण्याचा जो अतिश्रेष्ठ उद्योग तोही कालांतरानें धंदाच बनतो व इतर धंद्यांप्रमाणें ह्या धंद्याचेही पाश त्या व्यावहारिकाच्या प्रगतीस प्रत्यवाय करूं लागतात. ह्या प्रत्यवायांपासून मुक्तता करून घेऊन उन्नतीचा मार्ग अव्याहत चोखळण्यास प्रार्थने-

इतकें दुसरें उत्तम साधन नाहीं. मन प्रशांत करून, आकांक्षेच्या सर्व नाड्या बंद करून, विकारांचा भर थांबवून, सर्व चिंतनें स्तिमित करून, विचारांची धाव थोपवून व कल्पनांस त्यांच्या सरावाच्या चाकोरींतून बाहेर खेंचून ज्या वेळीं एका बाजूस परमात्मा व दुसरे बाजूस त्याचा तन्मय झालेला भक्त एवढीच जोडी शिल्लक राहते त्या वेळीं ह्या ऐहिक जिविताचीं बंधनें तटातट तुटून मनुष्य आपल्या सहज स्वभावानें विराजमान होतो व त्याच्यावर अंमल गाजविणारी प्रत्येक भावना, खुणेचा शब्द उच्चारल्याप्रमाणें, त्यास आपल्या पहाऱ्यांतून बिनधोक जाऊं देते. प्रार्थना ही परमात्मा व जीवात्मा ह्यांच्यामधील दूती आहे. ज्ञानाची वाट, पराविद्येचीं वळणें, अनुभूतीची गुहा व अंतःप्रसादाचें तळघर तिला पूर्णपणें माहीत आहे. प्रार्थनेची कांस धरणें ह्मणजे डोळे मिटून परमात्मप्राप्तीचा मार्ग चोखाळण्यासारखें आहे. मानवाच्या रजः प्रधान मनोवृत्तींत परात्पर तत्त्वांचें स्फुरण जर कोणी घडवील असेल तर ती प्रार्थना हीच होय आणि ह्याचमुळें मनुष्याच्या उच्चतर आयुष्यक्रमणांत प्रार्थनेस फारच प्रमुख स्थल देण्यांत आलेलें आहे.

आतां प्रार्थना ह्मटली ह्मणजे ती खरीखुरी प्रार्थनाच असली पाहिजे, प्रार्थनेच्या नांवाखालीं प्रार्थनेचें सोंग अथवा प्रार्थनेचा नुसता आभास असला तर जी गोष्ट खऱ्या प्रार्थनेनेंच व्हावयाची ती असल्या नुसत्या नाटकानें होणार नाहीं हें उघडच आहे. प्रार्थना

ह्मटली ह्मणजे तिच्या अंगीं तन्मयता पाहिजे. प्रार्थनेची सफलता प्रार्थनेंत किती वेळ घालविला असल्या अंकगणिती हिशेबावर अवलंबून नसून प्रार्थनेमध्यें तादात्म्य कोठपर्यंत साधलें ह्यावर अवलंबून आहे. प्रार्थना एका क्षणांतसुद्धां होऊं शकते व एक सबंध दिवस ईश्वर-सेवनाच्या नांवाखालीं खर्च केला तरीसुद्धां प्रार्थना मुळींच होत नाहीं. प्रार्थनेमध्यें तल्लीनता हा मुख्य गुण नसेल तर ती प्रार्थना निरर्थकच समजली पाहिजे. आत्मसमर्पण हें प्रार्थनेचें मोठेंच अंग आहे व ह्यावरच सर्व विचारी पुरुषांनीं फार भर दिलेला आढळतो. माझें जें कांहीं आहे, मी जें कांहीं केलेलें आहे, मला जें कांहीं मिळ-वितां आलेलें आहे, ज्या सद्गुणांबद्दल माझी प्रख्याति आहे, जें यश मी जोडलेलें आहे, जी कीर्ति मीं प्राप्त करून घेतलेली आहे व जें कर्तृत्व माझे अंगीं आहे, तें सर्व, हे सृष्टिकर्त्या, तुझें आहे, अशी अंतः-करणाच्या निर्विशेष व साहजिक स्फुरणानें ज्याची भावना झाली त्याचीच प्रार्थनेच्या वेळीं खरी तल्लीनता झाली असें ह्मटलें पाहिजे व अशी तल्लीनता ज्याची होईल त्यानेंच खरें आत्मसमर्पण केलें, इत-रांनीं स्वतःस चांगलेंच फसविलें असें ह्मणावयास नको काय ?

प्रार्थनेच्या योगानें ईश्वर आणि मानव ह्यांचा जो प्रेमसंबंध जडतो तो एक प्रकारानें अविभक्त कुटुंबासारखा असतो. पण आत्मसम-र्पणानें ईश्वर मानवाच्या प्रत्येक कृतीचा, विचाराचा व लाभाचा, प्रार्थना करणाऱ्याच्या संमतीनें मालक बनतो खरा, पण परमेश्वरा-

ङे येणारी ती मालकी एकांगी नसते. जेव्हां प्रार्थना करणारा मी । माझें हीं दोघेंही परमेश्वराचीं अशी भावना धरतो या वेळीं परमेश्वर व परमेश्वराशीं संबद्ध असलेलें र्व जग हीं साहजिकपणेंच प्रार्थना करणाऱ्याचीं होतात. मी व ाझें सर्व, हें परमेश्वराचें आहे, व, परमेश्वर व परमेश्वराचें सर्व, माझें आहे अशी जेव्हां अन्योन्यवालंबी चेतना मानवाचें अंतःकरण ागृत करिते तेव्हां प्रार्थनेची पूर्ण सार्थकता होऊन, अपयश, असमा- ान, तळमळ, भीति ह्या सर्व विकारांपासून मानवाची सुटका होते. रमेश्वराचें कृपाछत्र आपल्या मस्तकावर आहे अशा खात्रीलायक ल्पनेनें जे महापुरुष कालाशींसुद्धां दंड थोपटून झुंझण्यास तयार ।सतात ते अशा कोटींपैकीं असतात व परमेश्वर हा जगाचा पिता ाहे ही अत्यंत समीचीन व सूचक उपमा वर वर्णना केलेल्या तनेचेंच अपत्य होय. मुलगा जसा बापाचा सर्वतोपरीनें वारस सतो व जसा बाप मुलाचा पालनकर्ता, शिक्षणकर्ता व त्यास ापलें प्रेमसर्वस्व अर्पण करणारा असतो त्याचप्रमाणें परमेश्वर व ानव ह्यांचा संबंध आहे ह्यापेक्षां ज्यास्त हितकर ऐक्य दुसरी ोणती उपमा सिद्ध करणार ?

जगामध्यें जितके ह्मणून धर्मग्रंथ आहेत त्या सर्वांनीं प्रार्थनेस फारच त्त्व दिलेलें आहे. आपणा हिंदु लोकांचा जो सनातन धर्म त्यानेंही र्थनेची महती अगदीं प्रांजलपणें गाइलेली आहे व हिंदुधर्मानें मान्य

केलेले कित्येक उत्कृष्ट ग्रंथ केवळ प्रार्थनापरच आहेत. वेद हें हिंदुधर्माचें सौभाग्य आहे ही गोष्ट सर्वांस विदितच आहे, कारण हिंदुधर्माच्या अफाट ग्रंथविस्तारांत जर कोणत्याही एका ग्रंथाविषयीं सर्वांची अनन्य पूज्यबुद्धि आढळून येत असेल तर ती वेदांविषयींच होय. परंतु वेदांत प्रार्थनेस इतकें महत्त्व दिलेलें आहे कीं वेदांतील सर्वांत ज्यास्ती भाग प्रार्थनांनींच व्यापून टाकला आहे. ज्या एका सर्वोत्कृष्ट प्रार्थनेनें वेदग्रंथाची सुरवात झाली आहे ती आम्हीं आरंभीं उध्दृत केलीच आहे व तिची मराठी प्रतिकृति व वृत्तात्मक छायाही आम्हीं तेथें दिली आहे. कित्येक प्राचीन धर्मग्रंथांचा प्रार्थनांनीं आरंभ झालेला आपण पहातों, पण सर्वांत वेदांचा आरंभ ज्या प्रार्थनेनें झाला आहे ती फारच वर्णनीय आहे ह्यांत शंका नाहीं. प्रार्थनेचीं सर्व अंगें ह्या प्रार्थनेंत स्पष्ट रीतीनें प्रतिबिंबित झालेलीं आहेत व प्रार्थना जितक्या तळमळीनें उपासकाच्या अंतःकरणांतून बाहेर पडावी लागते तितकी तळमळ, तितकी उत्कंठा, तितकी मनाची असोशी, तितकी हृदयाची घाई ह्या प्रार्थनेच्या शेवटच्या कडव्यांत उठाव रीतीनें दृष्टोत्पत्तीस आलेली आहे. ' उप त्वाग्ने दिवेदिवे दोषावस्तार्धिया वयं, नमो भरंत एमासि ' [ प्रतिदिनिं रात्रीं प्रतिदिनिं दिवसा नमुनि भक्तिनें तुला । शोधितों आश्रय तव वत्सला ] ह्या गोड परंतु उत्कंठेनें रसरसलेल्या वाक्यांत भाव, नम्रता, विश्वास व प्रेम ह्यांची किती मनोहर रीतीनें गर्दी उसळलेली आहे! प्रार्थना कशी असावी ह्याची **अग्निमीळे** हें सूक्त केवळ आदर्शच आहे असें ह्मटलें तरी चालेल. इतक्या सुंदर प्रार्थना जे लोक सर्व-

लीन मनोभावनेनें गात असत ते परमेश्वराच्या कृपेस पूर्णपणें पात्र झाले असल्यास आश्चर्य नाहीं. आत्मार्पण—एकतानता—हें जें प्रार्थनेचें उत्कृष्ट अंग असतें असें वरती सांगितलें आहे त्याचेच भरांत येथें गायकानें परमेश्वरास 'बापा' ची उपमा दिलेली आहे व 'आमच्यापासून दूर जाऊं नको' असें त्यास केविलवाण्या स्वरांत विनविलें आहे. "आह्मी तुझीं लेंकरें आहोंत, मायाळू पित्याप्रमाणें आमचे लाड तूं उत्तम तऱ्हेनें पुरव" असलें लडिवाळ भाषण ऐकून कठोर हृदयी मानवांचेंसुद्धां चित्त गहिंवरून जाईल, मग 'लोण्या'प्रमाणें ज्याचें अंतर मऊ आहे अशा परमेश्वरास असल्या लागट भाषणानें पान्हा फुटला तर त्यांत नवल तें काय? परमेश्वराचें पितृत्व हें जें देव—मानवांच्या परस्परसंबंधांतलि खुबीदार मर्म तें साध्या परंतु अतिशय उत्तम शब्दांनीं ह्या प्रार्थनेंत व्यक्त झालें आहे. जो परमेश्वर हा सर्व जगाचा स्वामी होय, ज्यानें सर्व जगत् उत्पन्न केलें, व सर्व जगाचें मीलन करण्याचें ज्याचे हातांत आहे, अणुरेणूपासून सर्व सृष्ट पदार्थांची व व्यक्तींची भवितव्यता जो आपले हातांत वागवितो, अशा परमेश्वराचा व मानवांचा संबंध सत्ताधिकारी व सत्तानिविष्ट अशा दोन व्यक्तींसारखा असला पाहिजे. परमेश्वरानें सत्ता चालवावी व मानवांनीं ती सत्ता निमूटपणें मान्य करावी असा वास्तविक परमेश्वर व मानव ह्यांच्या दरम्यानचा व्यवहार असला पाहिजे. परमेश्वरानें आपल्या सत्तेस कोणताही आळा ठेवूं नये व मानवांनींही त्याचा अधिकार यत्किंचित् कुरकूर न

करितां सहन करावा असें वास्तविक परमेश्वर व मानव ह्यांचें नातें असलें पाहिजे. परमेश्वर हा राजा आहे, हा सम्राट् आहे, हा प्रभु आहे, इत्यादि कल्पनांत आपणांस हाच विचार प्रमुखपणानें आढळतो. हा विचार एका दृष्टीनें जितका खरा आहे, तितकाच तो भीति उत्पन्न करणारा आहे. कारण ईश्वरास केवळ ' शास्ता ' ह्या दृष्टीनें ओळखल्यास त्याचें शासन, त्याच्या शिक्षा, त्याचे कडक दंड हेच तेवढे आपल्या डोळ्यापुढें उभे राहतील व त्याच्या मार्दवाचा, व वात्सल्याचा अगदीच विसर पडेल. परमेश्वरास केवळ ' शास्ता ' ह्या दृष्टीनें ओळखणारास ' तूं आमच्यापासून दूर जाऊं नको " असें त्यास विनाविण्याची कधीं तरी छाती होईल काय ? परंतु वेदांतील प्रथम प्रार्थनेंत परमेश्वराच्या प्रभुत्वाकडे जरी कानाडोळा केलेला नाहीं, तथापि त्याच्या पितृत्वावर विशेष जोर दिलेला आहे. परमेश्वराचें प्रभुत्व ओळखणें फारसें कठिण नाहीं, कारण त्याचें प्रभुत्व सर्वत्र पसरलेलें आहे. परंतु त्याचें पितृत्व ओळखण्यास जी एक प्रकारची सूक्ष्म दृष्टि लागत असते त्या सूक्ष्म दृष्टीचा वेदांतील प्रथम प्रार्थनेंत पूर्ण उपयोग करून परमेश्वराच्या सांनिध्याविषयीं हांवरेपणा दाखविलेला आहे. ह्या प्रार्थनेंत हाच मोठा विशेष आहे व म्हणूनच ह्या प्रार्थनेस अत्यंत मनोहरत्व आलेलें आहे.

---

**एक आणा** किंमत ठेवली जाईल. टपाल खर्च प्रत्येक पुस्तकास अर्धा आणा निराळा पडेल, परंतु जे **श्रुतिबोधाचे** वर्गणीदार बारा आणे किंमत आगाऊ भरतील अथवा मनीऑर्डरीनें पाठवून देतील त्यांस **कोणत्याही प्रकारचा इतर खर्च न** घेतां आह्मी वर्षभर उषा-ग्रंथ-माला पुरवणार आहों. ज्यांनीं **उषा-ग्रंथ-मालेचें** पहिलें पुस्तक घेतलें असेल त्यांनीं फक्त **अकरा आणे** पाठवून द्यावे अथवा आम्हांस व्ही पी. करण्यास लिहावें. व्ही. पी. चा चार्ज एक आणा निराळा पडेल. जे **श्रुतबोधाचे** वर्गणीदार नाहींत त्यांस आगाऊ **एक रुपया** ( म्हणजे व्ही. पी. नें **एक रुपया एक आणा** ) पडेल.

**उषा-ग्रंथ-माला** सर्व महाराष्ट्रीय रसिकांस वाचनीय व्हावी अशी योजना आह्मीं करणार आहोंत. प्रत्येक ग्रंथाच्या अवलोकनानें वाचकांच्या ज्ञानांत भर पडेल, त्यांचा सात्त्विक आनंद वाढेल, त्यांस नवीन कल्पना सुचतील किंवा त्यांच्या सद्‌भावना जागृत होतील अशी व्यवस्था करण्याचें आमचे मनांत आहे. **उषा-ग्रंथ-मालेंत** उत्तम उत्तम लेखकांचे लेख प्रसिद्ध करण्याचा आमचा इरादा आहे व ह्मणून कोणींही सुंदर लेख, उत्कृष्ट कविता, बोधप्रद गोष्टी अथवा स्फूर्तिदायक, निबंध आमचेकडे पाठविल्यास त्यांचा आह्मी आनंदानें स्वीकार करूं. परंतु उषा-ग्रंथ-मालेचें धोरण आपल्या डोळयांपुढें ठेवून लेखकांनीं आपले लेख सजविले पाहिजेत. नापसंत लेख ज्यांस परत पाहिजे असतील त्यांनीं लेखांबरोबर टिकिटें पाठविण्याची कृपा करावी.

पुढील पुस्तकांत फार महत्त्वाचे लेख यावयाचे आहेत व लवकरच **किमया** ह्या विषयावर एक व्यापक व विस्तृत लेखमाला सुरू व्हावयाची आहे. महाराष्ट्रानें **उषा-मालेचें** प्रेमानें स्वागत केल्यास महाराष्ट्रीय वाङ्मय त ज्ञानप्रद ग्रंथांची भर टाकण्याची आमची उमेद आहे. ती पूर्ण करण्यास ईश्वरीकृपेची याचना करून हें मनोरथकथन आह्मी येथें समाप्त करितों.

Printed by B. S. Chouglmle at the C. N. Printing Press, 621 Girgaon Bom

Published by N. V. Mahajani, Shrutibodh Office, 47, Kalbadevi Bomb